

पहिला शिक्षक
चिंगिज़ ऐटमाटोव
अनुवाद
सुमन ओक

हे मूळ रशियन भाषेतील पुस्तक आहे. याच्या हिंदी अनुवादाच्या पहिल्या तीन आवृत्त्या रादुगा प्रकाशन, सोविएत संघ यांनी प्रकाशित केल्या होत्या.

ISBN 978-81-237-5933-3

पहिली आवृत्ती : 2010 *(शके 1932)*
दुसरी आवृत्ती : 2012 *(शके 1934)*

Duishen *(Russian Original)*
Pahiala Shikshak *(Marathi)*

**₹ 40.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नेहरू भवन, 5 इन्स्टिट्युशनल एरिया
वसंत कुंज, फेज-II, नवी दिल्ली-110 070 यांनी प्रकाशित केले.

खिडकी सताड उघडली की ताज्या हवेचा झोका माझ्या खोलीमधे शिरतो. फिक्या निळसर संधिप्रकाशामध्ये नव्या चित्रांची रेखाटने पसरून मी त्यांच्याकडे न्याहाळून पाहतो. ही रेखाटनं बरीच आहेत. आणि मला ती पुन्हा पुन्हा सुरुवातीपासून काढावी लागत आहेत. संपूर्ण चित्र एवढ्यात डोळ्यासमोर येत नाही. थंडीचा मोसम संपून उन्हाळा नुकताच सुरू झाला. पहाटेची वेळ जास्त जास्त स्वच्छ उजेड घेऊन येते आणि तुमच्या मनामध्ये अगदी खोल कप्प्यात एक गूढ सरगम छेडून जाते. अशा पहाटेसारखा अचानक येऊन माझ्या चित्राला उजळून काढील असा त्या चित्रांचा गाभाच अजून मला सापडलेला नाही. रात्रीच्या शांततेमध्ये मी आपल्या खोलीत येरझाऱ्या घालीत राहतो. विचार करीत राहतो. हे असंच सारखं चाललंय आणि प्रत्येक वेळी मला तीव्र जाणीव होते, की माझं चित्र म्हणजे एक नुसती पुसट कल्पना बनून राहिलं आहे. त्यापुढे ते सरकतच नाहीये.

तसं पाहिलं तर मी आपल्या जिवलग मित्रांशी सुद्धा माझ्या चित्रांबद्दल ती पुरी व्हायच्या आधी काही बोलत नाही. म्हणजे डोळ्यात तेल घालून मी माझं स्वतःचं काम आणि कल्पना जपत असतो असं नव्हे. पण त्याबद्दल बोलत नाही एवढ्यासाठी की पाळण्यामधलं बाळ मोठं झाल्यावर कसं दिसेल हे आधी सांगताच येत नाही. चित्रांचं तसंच आहे. अर्धवट चितारलेल्या चित्रांबद्दल कोणाला काय सांगता येईल? परंतु आत्ता, या एका चित्राबाबत मात्र मला माझा नियम मोडावा लागत आहे. जे कुणी ऐकू शकतील त्या सर्वांना मला सांगायचं आहे. या पूर्ण होत नसलेल्या चित्राबद्दल मला आपले विचार सगळ्यांना सांगायचे आहेत आणि माझ्या साऱ्या श्रोत्यांचे विचार जाणून घ्यायचे आहेत.

याला कोणी तऱ्हेवाईकपणा वा लहरीपणा समजू नये. या शिवाय मला गत्यंतरच नाही. कारण हे प्रचंड चित्र माझ्या एकट्याच्या आवाक्याच्या





बाहेरचं आहे. ज्या गोष्टीनं मला झपाटलं आहे, कुंचले हातात घ्यायला भाग पाडलं आहे ती गोष्ट एवढी प्रभावी आहे की मी एकटा तिला माझ्या कवेत घेऊच शकत नाही. काठोकाठ भरलेला प्याला हातात घेऊन बसलोय आणि तो सांडेल या भीतीने पछाडलो आहे. म्हणून मला तुम्हा सगळ्यांची मदत हवी आहे, सल्ला हवा आहे. मी काय करावं हे मला सांगा. चित्र काढायच्या फळ्याजवळ माझ्या जवळ उभे राहा. मताने तरी माझ्या जवळ या आणि माझ्या भावनांमध्ये सहभागी व्हा.

माझ्या अगदी जवळ या. तुमच्या हृदयाची ऊब मला मिळू द्या. ही गोष्ट सांगणं मला भाग आहे. माझं ते कर्तव्यच आहे. आपली आपुलकी मला नाकारू नका.

आमचं हे कुर्कुरू गाव पर्वतांच्या पायथ्याशी असलेल्या रुंद पठारावर वसलेलं आहे. इथे लहान लहान ओढे दऱ्याखोऱ्यांमधून खळखळत येतात. गावाच्या खालच्या बाजूस दरीमध्ये एक मोठे कझाक कुरण आहे—'पिवळी दरी' (Yellow Valley) म्हणतात त्याला. त्याच्या आजूबाजूला 'ब्लॅक माऊंटन'च्या (कृष्णगिरी म्हणूया त्याला) रांगा आहेत. त्यामधून रेल्वेचे रूळ थेट क्षितीजापर्यंत जातात, पुरं सपाट मैदान ओलांडून पश्चिमेकडे दिसेनासे होतात.

गावाच्या मागच्या बाजूच्या टेकडीवर दोन खूप मोठी पॉप्लरची झाडं आहेत. मला आठवतं तेव्हापासून ती झाडं आहेतच. कुठल्याही वाटेनं कुर्कुरू गावात मधे शिरलं तरी सगळ्यात आधी तुम्हाला दिसतील ही दोन पॉप्लरची झाडं, लांबून ओळखू येईल अशी डोंगरमाथ्यावरची गावाची खूण. त्या झाडांबद्दल मला काय वाटतं हे सांगणे कठीण आहे. लहानपणच्या आठवणी फार मोलाच्या असतात म्हणून असेल किंवा चित्रकला माझा व्यवसाय आहे म्हणून असेल. परंतु प्रत्येक वेळी मी आगगाडीमधून उतरून मैदानातून घराकडे येऊ लागलो की अगदी लांब असताना सुद्धा माझी पॉप्लर झाडं सहीसलामत आहेत की नाहीत हे मी डोळे फाडून बघत राहतो. इतक्या लांबून ही प्रचंड झाडंसुद्धा दिसणं तसं शक्य नाही पण माझ्या दृष्टीला ती तिथे दिसतात. अगदी चाचपून पाहिल्यासारखी वाटतात.

कितीही दूर गेलो तरी मी अनेक वेळा गावाकडे येतो. प्रत्येक वेळी मला

जुन्या आठवणींची ओढ लागते. मनामध्ये हुरहुर वाढते, माझी दोन पॉप्लर झाडं मला केव्हा दिसतील असं होऊन जातं. 'मी घरी पोहचेन का? टेकडी चढून, झाडांखाली बसून मला त्यांच्या पानांची सळसळ ऐकायची आहे. खूप खूप वेळा.'

पुढे कितीतरी वर्षांनंतर मला या पॉप्लर झाडांचं गूढ उकललं. ऊंचावर असल्याने सर्व दिशांकडून येणारे वारे त्यांच्या अंगावर येतात. हवेतील लहानसहान हालचालींचासुद्धा त्यांच्यावर परिणाम होत असतो. अगदी नाजूक झुळूक आली तरी या झाडांचं प्रत्येक पान हेलावतं.

हे साधं शास्त्रीय तथ्य समजल्यामुळे झाडांचं गूढ उलगडलं तरी माझी मुळीच निराशा झाली नाही. माझी त्या झाडांबाबतची बालीश आपुलकी मी आजही तशीच बाळगून आहे. आजही त्या जिवंत झाडांबाबत माझ्या मनात तेवढंच कुतूहल आहे. त्या झाडांच्या पायाशी मी माझं बालपण सोडलं आहे–हिरव्या जादुई आरशाच्या तुकड्यासारखे!

उन्हाळ्याची सुट्टी सुरू होण्याच्या आधीच्या-शाळेच्या शेवटच्या दिवशी आम्हा मुलांचं एक टोळकं पक्ष्यांची घरटी मिळवण्यासाठी आरडाओरड करीत, मोठमोठ्याने आरोळ्या ठोकत, पळत पळत टेकडीवर जात असे. ते प्रचंड वृक्ष जणू काही डोलत डोलत गुणगुणायचे आणि आम्हाला सांगायचे, या इथे आमच्या थंड सावलीमध्ये. पण आम्ही अनवाणी उडाणटप्पू मुलं सरसर झाडांच्या फांद्यांवर चढून जायचो आणि तिथल्या पक्षांच्या राज्यांमध्ये हलकल्लोळ माजवायचो, बिचारे पक्षी आमच्या डोक्यावर घिरट्या घालीत राहायचे, किलकिलाट करायचे. पण त्याचं आम्हाला काय? आम्ही आणखी ऊंच ऊंच चढायचो. सगळ्यांमधे चपळ, चलाख, शूर कोण आहे हे पाहण्यासाठी! आणि एकाएकी, जादू केल्याप्रमाणे आमच्यापुढे एक सुंदर अवकाश आणि उजेडाचं जग उलगडायचं. त्या जगाची भव्यता आम्हाला मुग्ध करायची. आम्ही श्वास रोखून त्याकडे पाहत राहायचो. आवाज करता, गुपचुप जो तो आपापल्या फांदीवर बसून राहायचा. पक्षी, त्यांची घरटी पळविण्याचे बेत कुठल्या कुठे विरून गेलेले असायचे! गावच्या शेतकऱ्यांचा सामुदायिक तबेला जो आम्हाला जगातील सर्वांत मोठी इमारत वाटायचा तो या मोक्याच्या जागेवरून एखादी छोटी लाकडी शेड वाटायचा. आणि



गावाच्या पलीकडे पसरलेलं ते कोरं न कुरतडलेलं कुरण; ते तर जणू काही विरळ चकचकीत धुक्यामधून तरंगायचं! त्याच्याही पलीकडे आणखीन जमीन होतीच. तो असल्याचा आम्हाला मागमूसही नव्हता. तसेच ते चांदीसारखे चमकणारे धागे लांबून दिसायचे, त्या होत्या नद्या! फांद्यांना घट्ट पकडून आम्ही विचार करायचो, 'तिथे जग संपतं का? की त्याच्याही पलीकडे आमच्यासारखंच आकाश, ढग, कुरणं, नद्या सगळं आहे?' निळसर धुक्यामध्ये दूर लपून बसलेल्या मनाला भुरळ घालणाऱ्या त्या गूढ प्रदेशाबद्दल वारे गाणी गुणगुणायचे. पॉप्लर झाडांची सगळी पाने एकमेकांशी कुजबुज करायची.

त्या दूरच्या प्रदेशाचं चित्र मी माझ्यासमोर उभं करू लागलो की मला पानांची सळसळ ऐकू यायची. भीती वाटायची आणि उत्सुकताही. छातीमध्ये धडधड सुरू व्हायची. आता जाणवतं आहे की त्या वेळेला ही पॉप्लरची झाडं कुणी लावली असतील असा प्रश्न आम्हाला कधीच कसा पडला नाही? ज्या कुणी लावली त्यांनी काय स्वप्न पाहिली असतील? छोट्या रोपांची मुळं खड्ड्यामये पुरताना तो काय म्हणाला असेल? त्या झाडांची काळजी घेताना. त्यांना मोठी होताना पाहताना त्याच्या मनामध्ये काय काय आशा फुलल्या असतील?

का कुणास ठाऊक; परंतु आमच्या गावाचे सारे लोक ह्या दोन पॉप्लरची झाडे असलेल्या टेकडीला नेहमी दुशेनची शाळा म्हणायचे. मला आठवतंय, एखाद्याची घोडी दिसत नसेल तर तो येणाऱ्या जाणाऱ्याला विचारी 'अहो माझी बदामी घोडी इथे जवळपास तुम्ही पाहिली का?' आणि त्याला उत्तर मिळे; 'काल रात्री दुशेनच्या शाळेजवळ घोडे चरत होते. तुमची बदामीही कदाचित् तिथे असेल. मोठ्यांप्रमाणे आम्ही मुलंही त्या टेकडीला दुशेनची शाळा म्हणत असू. पण हे नाव कसं पडलं असेल असा विचारसुद्धा आमच्या मनामध्ये कधी आला नाही. आमच्यातलंच कोणीतरी म्हणायचा, 'चला रे, आपण दुशेनच्या शाळेत जाऊन चिमण्यांना घाबरवून सोडू.'

लोक म्हणत की एके काळी त्या टेकडीवर एक शाळा होती. पण मला तेथे शाळेचा मागमूसही कधी दिसला नाही. लहान असताना तिथे इमारतीच्या काही खाणाखुणा दिसताहेत का हे मी शोध शोध शोधायचो. पण काहीच

सापडत नसे. पुढे मात्र ह्या उजाड टेकडीला लोकांनी दुशेनची शाळा म्हणावं याच मला खूप आश्चर्य वाटायचं. एकदा मी एका आजोबांना विचारलं की हा दुशेन होता तरी कोण? एकाने उडत उडत उत्तर दिलं, 'दुशेन होय? तो आहे की इथे अजून. त्याला लंगड्या मेंढ्यांच्या कळपांचा दुशेन म्हणतात. पण खूप खूप दिवसांपूर्वी तो कोमझोमोलचां सभासद होता. त्यावेळी त्या टेकडीवर एक मोडकळीस आलेली शेड होती. आणि तिथे ह्या दुशेननं एक शाळा सुरू केली होती. तो मुलांना शिकवायचा. कसली शाळा ती! तिला शाळा म्हणायचं तरी कसं? बाकी ते दिवसच मोठे विचित्र होते. तेव्हा कोणीही एखाद्या घोड्याची आयाळ पकडून रिकिबोमधे पाय अडकवावा, मग तुम्हीच तुमचे धनी. दुशेननं तसंच केलं. त्याच्या डोक्यामध्ये एक विलक्षण कल्पना आली. आणि लागलीच त्यानं ती अमलात आणली. आणि आता त्या मोडक्या तोडक्या शेडचा फुटका दगडसुद्धा उरला नाही. पण नाव मात्र चिकटलं त्या जागेला. एवढंच केलं त्या शाळेनं आमच्यासाठी.'

मी दुशेनना फारसा ओळखत नव्हतोच. एवढंच आठवतं की तो एक ऊंच, किडकिडीत वयस्क माणूस आहे. त्याच्या भुवया मोठ्या ठसठशीत आहेत. तो राहतो नदीच्या पलिकडच्या किनाऱ्यावर. सामुदायिक शेतीच्या पाणीपुरवठ्याचा तो मुकादम आहे आणि आपला दिवसाचा सारा वेळ तो शेतामध्ये राबताना दिसतो. कधी कधी एक भलं मोठं फावडं खोगीराच्या बाजूला बांधून तो आमच्या रस्त्यावरून घोड्यावर बसून जातो. त्याचा घोडाही त्याच्या सारखाच ऊंच आणि किडकिडित आहे. पुढे काही वर्षांनी कोणीतरी म्हणत होतं की दुशेन आता गावाचा पोस्टमन आहे. असो. त्या काळी कोमझोमोलचा सभासद म्हणजे कोणी तरुण, बोलण्याचालण्यात तडफदार, कळकळीने काम करणारा शूर शिपाई असं मी समजत होतो. अर्थातच बैठकीमध्ये तो ताठ उभा राहून आपल्या मनातले विचार परखडपणे सांगत असणार, चोर-लफंग्यांच्याबद्दल वर्तमानपत्रांमध्ये लिहीत असणार वगैरे वगैरे. आणि हा तर गरीब, दाढीवाला, वयस्क माणूस. हा कोमझोमोलचा सभासद असेल अशी कामनाही करवत नाही. त्याहीपेक्षा आश्चर्याची गोष्ट म्हणजे ज्याला स्वतःलाच लिहिणं—वाचणं कठीण होतं तो म्हणे शाळेत शिकवत होता. मला तर खरंच वाटलं नाही. आमच्या गावामध्ये अनेक



छोट्यामोठ्या अफवा पसरवल्या जातात. त्यातली ही एक असणार! पण माझा समज खोटा ठरला...

मागच्या शरद ऋतूमध्ये मला माझ्या या गावामधून एक टेलिग्रॅम आला. सामुदायिक शेतकऱ्यांनी आपल्या हातांनी गावामध्ये नवीन शाळा बांधली होती. त्याचा उद्घाटन समारंभ होता. मी ताबडतोब ठरवलं समारंभाला हजर राहण्याचं. माझ्या गावच्या अशा शुभ समारंभाची संधी मी कशी सोडणार? मी समारंभाच्या काही दिवस आधीच गावी पोहचलो. मला सगळी-सगळीकडे फिरायचं होतं. मला माझ्या प्रदेशाची काही नवीन चित्रं बनवायची होती. आता महान विदुषी म्हणून गाजलेल्या आमच्याच गावच्या एक बाई सुलेमानोव्हा यांना पण आमंत्रण आहे असेही मला समजलं होतं. त्या इथे एक-दोन दिवस गावामध्ये राहून मग मॉस्कोला जाणार होत्या.

या मान्यवर बाईंनी आमचं गाव अगदी लहानपणीच सोडलं होतं. मीही शहरवासी झाल्यावर त्यांना भेटलो होतो. त्यावेळी त्यांचं मध्यम वय होऊन गेलेलं होतं. त्यांच्या चमकदार काळ्या केसांमधील बरेचसे पांढरे पण झालेले होते. विद्यापीठातील तत्त्वज्ञान विषयाच्या त्या प्रमुखपदी होत्या. तत्त्वज्ञान विषयावरील व्याख्याने व विद्यापीठातील अभ्यासविषयक कामाबरोबर त्या अनेक वेळा परदेशी पण गेलेल्या आहेत. इतक्या व्यस्त असलेल्या या बाईंना वारंवार भेटणं व त्यांचा परिचय करून घेणं तसं कठीणच. परंतु जेव्हा केव्हा आमची भेट होत असे त्यावेळेस त्या आवर्जून गावाची चौकशी करीत. तसेच माझ्या नवीन चित्रांबद्दलही चार शब्द तरी बोलायला त्या कधीच चुकल्या नाहीत. एक दिवस मी मोठा धीर करून त्यांना विचारलं, ''अल्तिनई सुलैमानोव्हा तुम्ही आपल्या गावी जाऊन कधीच का राहत नाही? गावच्या लोकांना तुमचा केवढा अभिमान वाटतो. तुमच्याबद्दल त्यांना खूप काही माहिती आहे पण सगळी ऐकलेली. केव्हा केव्हा ते अशी तक्रारही करतात की तुम्हाला गावच्या लोकांबद्दल पुरेशी आपुलकी नाही. त्यांना भेटावंसं तुम्हाला वाटत नाही. गावाला तुमच्या भेटीचा मान मिळत नाही.''

''खरंच, मला एकदा गावी गेलंच पाहिजे,'' काहीसे खिन्न स्मित करीत त्या म्हणाल्या. ''कैक वेळा मी स्वप्नामध्ये आपला कुर्कुरू गाव पाहते. मी तिथे गेल्याला कैक वर्षे लोटून गेली. तिथे माझे कोणी नातेवाईक नाहीत हे

खरं आहे. पण ते काही महत्त्वाचे नाही. मी लवकरच तिथे जाईन. मला गावाची फार ओढ लागली आहे.''

...समारंभाला अगदी सुरुवात होता होता त्या आल्या. शाळेच्या नवीन इमारतीमध्ये गावाचे खूप लोक आलेले होते. त्यांची गाडी येत असल्याचे दिसताच सगळे रस्त्यावर आले. लहान, थोर, आप्त, मित्र, ओळख असलेले-नसलेले सारे त्यांच्याशी हस्तांदोलन करण्यास उत्सुक. अल्तिनईंना एवढ्या उत्साहाने केलेल्या स्वागताची कल्पना नव्हती. आणि त्या काहीशा गोंधळून गेल्यासारख्या मला वाटल्या. आपले हात छातीशी धरून, त्या लोकांच्याकडे डावी-उजवीकडे बघत लवून स्वागताचा स्वीकार करत होत्या. आणि गर्दीतून वाट काढीत त्या मंचावर ठेवलेल्या टेबलापर्यंत येऊन पोहचल्या.

अल्तिनईंनी आतापर्यंत असे कैक समारंभ आणि बैठकी पाहिल्या असतील. आणि सगळीकडेच लोकांनी त्यांचे मनापासून स्वागत केलेले असेल. पण आमच्या गावच्या शाळेमध्ये झालेले स्वागत इतकं उत्स्फूर्त होतं की त्यांचे डोळे पाणावले.

भाषणं संपल्यानंतर शाळेच्या तरुण संस्थापकांनी अल्तिनईंना पुष्पगुच्छ दिला, आणि लाल टाय् (तरुण अग्रेसर मंडळींचे चिन्ह) अर्पण केला. पहिले पाहुणे म्हणून नोंदवहीमध्ये स्वतःचे नाव लिहिण्याची विनंती केली. त्यानंतर हौशी बालकलाकारांचा एक सुरेख मनोरंजनाचा कार्यक्रम झाला. हा कार्यक्रम फार छान झाला. त्यानंतर मुख्याध्यापकांनी सगळ्यांना आपल्या घरी येण्यांचे आमंत्रण दिले.

यजमान आणि पाहुणे साऱ्यांनाच अल्तिनईंची खिदमत् किती करू आणि किती नको असे झाले होते. सर्वात सुंदर गालिचे होते तिथे त्यांना नेऊन बसविण्यात आले. सर्वच त्यांच्याबद्दलचा आपल्या मनातील कौतुकमिश्रित आदर व्यक्त करण्याचा प्रयत्न करीत होते. सगळेच मोठ्या उत्साहाने भडभडून बोलत होते, एकमेकांना दारुचे प्याले देऊन हित चिंतित होते. अशा मेळाव्यांमध्ये नेहमीच गलबलाट व उत्साह ओसंडत असतो तसाच याही मेळाव्यामध्ये होता.

एकढ्यात एका तरुण मुलानं यजमानांच्या हातामध्ये संदेशाच्या तारांचं



बंडल दिलं, शाळेच्या माजी विद्यार्थ्यांनी सामुदायिक शेतकऱ्यांचं नवीन इमारत बांधल्याबद्दल अभिनंदन केलेलं होतं त्या तारांमध्ये. त्या तारा सर्वांना वाचायला दिल्या.

मुख्याध्यापकांनी त्या मुलाला विचारले ''अरे या तारा दुशेनबाबांनी आणून दिल्या का?'' ''होय'' त्याने उत्तर दिलं, ''आणि दुशेन बाबा म्हणाले की ते घोड्याला चाबूक मारीत मारीत अगदी तातडीने इथे आले, सगळेजण हजर असताना तारा वाचता याव्यात म्हणून. बाबांना असं वाटत होतं की त्यांना थोडा उशीरच झालाय म्हणून ते फार उदास झाले होते.''

''अरे पण ते बाहेर काय करतायत? जा, त्यांना आत बोलावून आण.''

तो तरुण मुलगा दुशेनला बोलावण्यासाठी बाहेर गेला. माझ्याशेजारीच बसलेल्या अल्तिनई एकदम दचकल्या. कशाची तरी एकदम आठवण झाल्यासारखं त्यांनी मला विचारलं, ''हे कोणाबद्दल बोलत आहेत? हा दुशेन कोण आहे?'' त्यांचा स्वर व त्यांच्या बोलण्याचा रोख मला फार विचित्र वाटला.

''तो इथला पोस्टमन आहे. दुशेनबाबाला तुम्ही ओळखता?'' मी विचारलं. त्यांनी पुसटसा होकार दिला आणि चटकन उठून टेबलापासून निघाल्या. आणि त्याच वेळी कोणीतरी घोडेस्वार खुरांच्या टपटप आवाजात बाजूने जाताना खिडकीमधून दिसला. आणि मुलाने आत येऊन सांगितलं की दुशेन बाबा निघून गेले. ''ते आत येईचनात, त्यांना खूपशी पत्र पोहचवायची होती,'' मुलानं खुलासा केला.

''जाऊ दे त्याला पत्र वाटायला. त्याला कशाला इथे अडकवून ठेवायचं? तो नंतर इतर बुजूर्ग मंडळींबरोबर इथे येऊन बसेल.'' एकजण तिरकसपणे बोलला.

''अरे तुम्हाला आमचा दुशेन माहीत नाही. त्याला त्याचं कर्तव्य आधी. आपल्यावर सोपविलेले काम पार पडल्याशिवाय तो एक क्षण कुठे थांबणार नाही.''

''हा दुशेन मोठा विलक्षण माणूस आहे. लढाई संपल्यानंतर तो दवाखान्यामधून बाहेर पडला, युक्रेनमधल्या. आणि तिथेच राहिला. साधारण पाच वर्षांपूर्वी तो इथे आलेला आहे. तो म्हणतो की त्याला त्याच्या गावीच

मरायचे आहे. या माणसाने लग्न बिग्न काही केलेच नाही.''

''तो आत आला नाही ह्याचा फार खेद वाटतो. पण जाऊ द्या, काय करणार?'' यजमान म्हणाले.

''कॉम्रेड्‌स् (मित्रांनो) तुमच्यापैकी काहींना आठवत असेल की एके काळी आपण सगळे दुशेनच्या शाळेत जात होतो.''

गावच्या एका संभावित बुजुर्गाने म्हटले. आपल्या दारुचा पेला उंचावत तो पुढे म्हणाला, ''पण मला खात्री आहे की त्याला सगळी मुळाक्षरं सुद्धा येत नव्हती.'' टर उडविण्यासाठी तोंडाचा चंबू करीत त्याने आपली मान डोलावली. त्याच्या बोलण्यातून आश्चर्य आणि उपहास स्पष्ट दिसत होता.

''हो हो. अगदी खरं!'' बऱ्याच जणांनी होकार दिला. आणि सगळीकडे खसखस पिकली.

''खरोखरच, त्या दिवसांमध्ये दुशेनने काय काय करण्याचे प्रयत्न केले. आपणही किती चांगले होतो, त्याला आपण मनापासून आपला शिक्षक मानत होतो.''

हसण्याचा आवाज कमी झाल्यावर मुख्य वक्त्याने आपला प्याला पुन्हा उंचावत म्हटले, ''आमच्या त्या काळातील लोक आता किती मोठे झाले आहेत बघा. अल्तिनई सुलेमानोव्हा विश्वविद्यालयातील विदुषी आहेत. सर्व देशभर त्या प्रसिद्ध आहेत. आपणा सर्वांनीच माध्यमिक शिक्षणापर्यंत मजल मारली आहे. काहींनी तर उच्च शिक्षणही घेतले आहे. आज आपण आपल्या गावामध्ये नवीन माध्यमिक शाळा सुरू करीत आहोत. यामुळे आपलं आयुष्य किती बदललं आहे. कुर्कुरू गावची मुलं आणि मुली सदैव शिक्षणामध्ये अग्रेसर राहोत! त्यानिमित्त आपण मद्य घेऊ या.''

सगळ्यांनीच मद्य घेतले. पुन्हा मौजमस्तीत सर्व गुंग झाले. अल्तिनई मात्र बेचैन व अस्वस्थ दिसत होत्या. त्यांनी एका घोटापेक्षा जास्त मद्य घेतले नाही. पण हे कोणाच्याही लक्षात आलं नाही. सगळेच उत्साहात आनंदात मशगुल होते.

अल्तिनई आपल्या मनगटावरील घड्याळाकडे पुन्हा पुन्हा पाहत होत्या. काही वेळाने सर्व लोक खुल्या हवेसाठी बाहेर आले त्यावेळेस अल्तिनई एकट्याच इतरांपासून दूर उभ्या होत्या; पिवळट झालेल्या पॉप्लरच्या झाडांकडे टक लावून पाहत होत्या. टेकडीवरील ते दोन पॉप्लर वृक्ष हवेच्या नाजूक झोक्यांनी डुलत होते. जिथे आकाश कुरणावर टेकलं होतं, तिथे सूर्य अस्ताला जात होता. त्याच्या धूसर प्रकाशाने पॉप्लरच्या शेंड्यांना एक खिन्न वाटणारा मळकट, जांभळट रंग चढला होता.



मी अल्तिनईंच्या जवळ गेलो, आणि म्हणालो, ''आत्ता त्या झाडांची पाने गळताहेत. त्यांना वसंत ऋतूमध्ये पाहावं. पानांनी गच्च भरून जातात.''

''माझ्याही मनात तोच विचार आला,'' त्या एक उसासा टाकीत म्हणाल्या. थोड्या वेळाने जणू काही स्वतःशीच त्या बोलल्या, ''हो. सर्वच सजीवांना आपापला वसंत ऋतू व शिशिर ऋतू असतोच नाही का?''

त्यांचा वयस्क चेहरा सचिंत व खिन्न दिसला. त्या झाडांकडे पाहताना त्यांना एक स्त्रीसुलभ खेद वाटत असावा. विदुषी नाहिशी होऊन आता तिथे एक सर्वसाधारण बाळबोध किरगिझ स्त्री उभी होती. दुःख आणि आनंद दोन्हीही न लपवणारी, निष्कपट स्त्री! ती आपल्या तारुण्यांतील आठवणींमध्ये हरवून गेली होती. कितीही उंच पर्वतांवरून जोरजोरांनी हाका मारूनही कधीच परत न येणाऱ्या आठवणी! त्यांना मला काहीतरी नक्कीच सांगायचं होतं, त्या पॉप्लर वृक्षांकडे पाहत असताना. पण मग त्यांनी आपला विचार बदलला आणि हातामध्ये घेतलेला चष्मा त्यांनी घाईघाईनं डोळ्यावर चढवला.

''मॉस्कोला जाणारी गाडी मला वाटतं ११ वाजता सुटते. हो ना?'' त्यांनी विचारलं.

''हो ११ वाजता जाते.''

''मग मला स्टेशनकडे निघायला हवं!''

''पण असं एकाएकी का?'' मी विचारलं. ''तुम्ही तर इथे काही दिवस मुक्काम करायचं कबूल केलं होतं ना. मग इथले लोक तुम्हाला एवढ्या लवकर सोडणार नाहीत.''

''हो. पण मला मॉस्कोमध्ये एक तातडीचं काम आहे. आणि मला ताबडतोब निघालंच पाहिजे.'' त्यांनी ठाम निश्चय केला होता. त्यांचं मन वळविणं शक्य नव्हतं.

आता अंधार व्हायला लागला होता. गावच्या लोकांचा विरस झाला





होता. त्यांनी आपल्या लाडक्या पाहुणीला तिच्या गाडीपर्यंत पोहचवलं. आणि लवकरच पुन्हा कमीत कमी एक आठवड्यासाठी गावी येण्याचं त्यांच्याकडून वचन घेतलं. स्टेशनपर्यंत मी त्यांना कारनं पोहचवलं.

एकाएकी एवढी घाई का याचं मला आश्चर्य वाटलं. आपल्या गावच्या माणसांची मनं अशी दुखवणं म्हणजे वेडेपणाच आहे. आणि तेही अशा शुभ प्रसंगी! त्या असं का करीत आहेत असं मला विचारायचं होतं. पण एवढा धीर झाला नाही. म्हणजे माझ्यात तेवढे चातुर्य नाही असं नव्हे. पण मला जाणवत होतं की त्या मला काहीच सांगणार नाहीत तेव्हा विचारायचं तरी कशाला? स्टेशन येईपर्यंत त्या विचारामध्ये अगदी मग्न होत्या आणि चकार शब्द बोलल्या नाहीत.

"तुमचं काहीतरी बिनसल्यासारखं वाटतंय. आमच्याकडून काही चूक झाली का? तुम्हाला कोणाचा राग आलेला आहे का?" शेवटी मी एकदाचं विचारलंच!

"नाही, नाही. अजिबात नाही. कसलं रागावणं? आणि रागावणार तरी कोणावर? बहुतेक मी स्वतःवरच रागावले असेन. खरंच, मला माझाच राग आला आहे."

एवढं बोलून त्या निघून गेल्या. मी शहरात परत आलो. काही दिवसांनी मला त्यांचं एक पत्र आलं, खूप आश्चर्य वाटलं, अल्तिनईनी लिहिलं होतं की त्या मॉस्कोमध्ये ठरलं होतं त्यापेक्षा बरेच जास्त दिवस राहणार आहेत. त्यांनी पुढे लिहिलं होतं :

"मला मॉस्कोमध्ये अनेक निकडीची व महत्त्वाची कामे आहेत. तरी ती सगळी कामे तूर्त बाजूला ठेवून हे लांबलचक पत्र मी लिहीत आहे. माझी ही गोष्ट तुम्हाला आवडली, महत्त्वाची वाटली तर माझी तुम्हाला अशी विनंती आहे की तिला प्रसिद्धी कशी द्यावी ते मला सुचवा. केवळ आपल्या गावाच्या लोकांसाठीच नव्हे तर सगळ्यांसाठीच, विशेषतः तरुण मंडळींच्या फायद्यासाठी ती प्रसिद्ध व्हावी असं मला वाटतं, यावर मी खूप विचार केला व मग लिहिण्याचा निर्णय घेतला. लोकांना मला कबुलीजबाब द्यायचा आहे. मला तो देणं भाग आहे. जितके जास्त लोक हा कबुलीजबाब वाचतील तेवढं माझं मन हलकं होईल व माझ्या मनावरील दडपण जाईल. त्यामुळे माझी काही

नाचक्की होईल याची मुळीच काळजी करू नका. त्यातील काहीही झाकून ठेवण्याची गरज नाही.''

त्यांच्या पत्रामुळे मी एवढा झपाटलो होतो की मला दुसरे काही सुचेचना. तेव्हा अल्तिनईनी स्वतःच आपली कथा सांगितली तर ती जशी असेल त्याच स्वरूपामध्ये ती लोकांपर्यंत पोहचवायची हेच सर्वात उत्तम असं मी ठरविलं.

हे सर्व घडलं १९२३ साली. हो. त्याच वर्षी...

आज आम्ही जी सामुदायिक शेती पाहतो आहोत त्या जागी त्या काळी एक लहानसं गरीब शेतकऱ्याचं खेडं होतं. मी तेव्हा १४ वर्षांची होते. माझ्या दिवंगत पित्याच्या चुलत भावाच्या घरी राहत होते. माझी आईदेखील हयात नव्हती.

शरद ऋतूमध्ये थोडेसे श्रीमंत असलेले मेंढपाळ डोंगरमाथ्याकडे गेलेले होते. एक अनोळखी माणूस सैनिकांचा काळा लांब कोट घालून आमच्या गावात आला. विचित्र दिसणारा हा लांब काळा कोट चांगला आठवतो. सैनिकाचा गणवेश घातलेला हा माणूस आमचं गाव व डोंगरांच्या रांगांच्या मधे येऊन वसल्यावर गावात बरीच खळखळ उडाली.

पहिल्याने लोक म्हणत की तो सैन्यामधला कमांडर होता. म्हणजे आमच्या गावातही तो मोठा अधिकारी म्हणूनच राहणार. पण नंतर समजलं की तो कमांडर वगैरे काही नव्हता. तो ताशूतनूबेकचा मुलगा होता. ताशूतनूबेकनं जेव्हा जेवायला काही नव्हतं अशा एका दुष्काळी थंडीमध्ये रेल्वेलाईनवर काम करण्यासाठी आमचं गाव सोडलं होतं, त्यानंतर त्याच्याबद्दल कोणाला काहीच ऐकू आलं नव्हतं. पण हा नवीनच गावात आलेला अनोळखी माणूस त्या ताशूतनूबेकचा मुलगा होता. दुशेन नावाचा! आमच्या गावामध्ये शाळा सुरू करून मुलांना लिहिण्या-वाचण्यास शिकविण्यासाठी तो इथे आला होता म्हणे.

आमच्या भागामध्ये त्या काळी शाळा बिळा असल्या नवथर कल्पना कोणी ऐकलेल्याही नव्हत्या. कोणाला ही बातमी खरी वाटली. पण बऱ्याच जणांना ती म्हाताऱ्या बायांनी उठविलेली अफवा वाटली. आणि ते ही गोष्ट विसरूनही गेले असते. परंतु दुशेन आल्यावर थोड्या दिवसातच एक



सर्वसाधारण सभा बोलावण्यात आली. माझ्या काकांना जायची इच्छा नव्हती म्हणून त्यांनी कुरकूर केली, ''कसली सभा ती! आम्हाला एवढी कामं असताना हे लोक मूर्खासारखे आमच्या कटकटी वाढवतात. परंतु शेवटी त्यांनी आपल्या म्हाताऱ्या तट्टावर खोगीर चढविला आणि एखाद्या स्वाभिमानी नागरिकाला शोभेल अशा ऐटीत सभेच्या जागी पोहचले. त्यांच्यामागून मी आणि आसपासची मुलेही पळत पळत गेलो.

धापा टाकत आम्ही टेकडीवर पोहचलो. नेहमी इथेच सभा भरविल्या जात. तिथे तेच जरा फिकट चेहऱ्याचे, सैनिकी पायघोळ कोट घातलेले गृहस्थ घोड्यावरून आलेल्या, पायी आलेल्या सर्व सभासदांना काही सांगत होते. लांबून आम्हाला नीट समजेना म्हणून आम्ही आणखी पुढे सरकलो. अगदी जुना, फाटका फरकोट घातलेल्या एका म्हाताऱ्या माणसाने मधेच त्यांना थांबवत म्हटले, ''हे बघ मुला, आतापावेतो मुल्ला मुलांना शिकवीत असत. तुझ्या बापाला आम्ही चांगले ओळखतो, तो तर आमच्यासारखाच दरिद्री होता, आणि आम्हाला हे समजत नाही की तू मुल्ला कसा रे झालास?''

''मी मुल्ला नाहीये आजोबा. मी ओह कॉम्सोमोलचा सभासद.'' दुशेन म्हणाला, ''आता मुलांना शिक्षक शिकवतील. आता मुल्ला नाही शिकविणार. सैन्यामध्ये असताना मी लिहायला आणि वाचायला शिकलो. त्याआधी मी काही दिवस शाळेत सुद्धा गेलेलो आहे. एवढ्यापुरताच मी मुल्ला!''

''अस्सं? ही वेगळीच गोष्ट आहे.'' लोकांनी मोठ्या आवाजात आपली संमती दाखविली.

''तर या कोम्सोमोलनं मला इथे पाठविले आहे. तुमच्या मुलांना शिकविण्यासाठी. त्यासाठी आपल्याला एखादी जागा लागेल. मला एक शाळा उघडायची आहे. अर्थात तुमच्या मदतीनेच; त्या टेकडीवरच्या जुन्या तबेल्यामध्ये. पसंत आहे का ही कल्पना तुम्हाला?'' दुशेन म्हणाले.

लगेच होकार द्यायला मंडळी तयार नव्हती. ह्या नवख्या माणसाला काय करायचं आहे याबाबत त्यांना खात्री नव्हती. सातिमकुल प्रत्येक गोष्टीला आडमुठेपणाने विरोध करायचा. त्यानेच शेवटी सगळ्यांची चुप्पी तोडली. वेळोवेळी दातामधून पिचकाऱ्या थुंकत तो खोगीराच्या खुंट्यावर पुढे रेलून

बसला होता. तिरकस डोळ्यांनी दुशेनचा निशाना साधत तो म्हणाला, ''हे बघ पोरा तू आधी आम्हाला हे सांग की आमच्या सारख्यांना शाळा हवीच कशाला?''

''शाळा हवीच कशाला?'' दुशेनने त्याचाच प्रश्न पुन्हा उच्चारला. त्याला काय उत्तर द्यावे हेच कळेना.

''होय, अगदी बरोबर. कशासाठी शाळा?'' कोणीतरी ओरडला. सगळेच एकदम बोलायला व आरडाओरडा करायला लागले.

''आयुष्यभर आम्ही जमीन कसतो आहोत. आम्हाला आठवत सुद्धा नाही इतक्या जुन्या काळापासून. आमचं हे फावडंच आम्हाला भाकर मिळवून देणार आहे. आमची मुलंही अशीच जगणार. शिकून आम्हाला काय धाड मारायची आहे? ऑफिसमध्ये काम करणाऱ्यांनी शिकावं. आम्ही आहोत साधेसुधे खेडुत. तेव्हा तू आमच्यामध्ये गोंधळ घालू नयेस हेच बरं.''

हळूहळू लोक थोडे शांत झाले.

''तुमच्या मुलांनी शाळेच्या जाण्याच्या आड तरी तुम्ही येणार नाही. नाही का?'' आजूबाजूचे चेहरे न्याहाळत हादरून गेलेल्या दुशेनने विचारले.

''समजा आम्ही आड आलो तर तू काय जबरदस्ती करणार आहेस काय? ते जबरदस्तीचे दिवस आता संपले आहेत. आता आम्ही स्वतंत्र आहोत. आम्हाला हवं तसंच आम्ही जगूं.''

दुशेन पांढराफटक पडला. थरथरत्या हातांनी त्याने आपल्या लांब कोटाचे हूक काढले आणि आतल्या खिशामध्ये चाचपून त्याने चारदा घडी केलेला एक कागद घाईघाईने बाहेर काढला; त्याच्या घड्या झटकीत तो कागद हातात उंच धरून फडकवला. ''म्हणजे तुम्ही या फतव्याच्या विरुद्ध आहात. यामध्ये लिहिलं आहे की मुलांनी शाळेमध्ये गेलंच पाहिजे. आणि त्याच्यावर सोव्हियत सरकारचं शिक्कामोर्तब आहे. तुम्हाला हे स्वातंत्र्य कोणी मिळवून दिलं? कोणी दिली तुम्हाला जमीन व पाणी? बरं, सोव्हियत सरकारच्या कायद्याच्या विरुद्ध कोणकोण आहेत? बोला! उत्तर द्या.''

'उत्तर द्या' हे शब्द त्याने एवढ्या आवेशाने आणि एवढ्या दणदणीत आवाजात उच्चारले की ते बंदुकीच्या गोळीसारखे त्या शरदाच्या मृदु शांततेमधून घुसून समोरच्या पर्वतराशींवर आदळले आणि तेथून त्याचे स्पष्ट



पडसाद उठले. कोणी एक अक्षर बोलेना. सगळे माना खाली घालून गप्प उभे होते.

''आपण सगळे आहोत गरीब शेतकरी,'' दुशेन शांतपणे म्हणाला. ''आयुष्यभर आपण अपमान सहन केला. लाथाबुक्क्या खाल्ल्या. अंधारात राहिलो. आता सोव्हियत सरकार धडपड करीत आहे आपल्याला उजेड दाखविण्याचा. आपल्याला लिहायला-वाचायला शिकविण्याचा. आणि त्यासाठी आमच्या मुलांना शाळेची गरज आहे.''

बोलणे संपवून दुशेनने इकडे तिकडे पाहिले. जुना पुराणा फरकोट घातलेला म्हाताराच पुन्हा बोलला. ''बरं. तुला शिकवायचं असेल तर शिकव. पण आम्हाला त्याच्याशी काही देणे-घेणे नाही हे मात्र लक्षात ठेव.''

''पण मी तुमची मदत मागतो आहे. त्या तबेल्याची बरीच दुरुस्ती करायला लागेल. ओढ्यावर छोटासा पूल बांधावा लागेल. आणि थंडीमध्ये शेकोटीसाठी जळण पण लागेल.

''जरा सबूरीनं, भल्या माणसा. एवढी घाई नको.'' सतिमकुल उर्मटपणे मधेच बोलला; पुन्हा एकदा दातांमधून पिचकारी सोडून, एक डोळा किलकिला करून त्याने आपली भेदक नजर दुशेनवर खिळवली, ''इथे तू साऱ्या गावाला ओरडून सांगतोयस की तू शाळा सुरू करणार आहेस. पण मला हे स्पष्ट दिसतंय की तुझ्या पाठीवर न फरकोट आहे की इकडे तिकडे जायला एखादा घोडा आहे. नाही जमीन! नाही एखादा नांगरलेला व पेरणी केलेला जमिनीचा तुकडा. तुझ्या नावावर एखादी मेंढी सुद्धा नाही. भल्या माणसा तू जगशील तरी कशाच्या जिवावर? बहुधा दुसऱ्यांच्या मेंढ्या चोरून. हो ना?''

''मी आपला गुजारा करेन. मला पगार मिळेल.''

''अरेच्चा. म्हणजे पगार बोलतोय.'' सतिमकुल म्हणाला, स्वतःवरच खुश होत; खोगीरावर ताठ बसून विजय मिळाल्याच्या आवेशाने त्याने इकडे तिकडे पाहिले, ''आता सगळं लक्षात आलं. तू तुला स्वतःला पोसायचं. तुला मिळणाऱ्या पगाराच्या बदल्यात तू मुलांना शिकवायचेस. सरकारजवळ पुरेसा पैसा आहे. तेव्हा आमचा पिच्छा सोडून दे, आम्हाला आमच्या भरपूर काळज्या आहेत.''

एवढं बोलून सतिमकुल आपल्या घोड्याला पूर्ण वळवून तेथून निघून गेला. बाकीचेही त्याच्या मागोमाग चालू लागले. दुशेन एकटे हातात सरकारी फतवा धरून उभे होते; एकाकी, पराभूत, दुःखी.

मला त्यांच्याबद्दल खूप कीव आली होती. मी चुपचाप त्यांच्याकडे मोठ्या सहानुभूतीने पाहत राहिले. अखेरीस माझ्या काकांनी मला तेथून घालवून दिले, "इथे काय करीत बसली आहेस झिंज्या पसरून? आणि पाहतेस कुठे तोंड वासून? चालू लाग घरी ताबडतोब." मी माझ्या सवंगड्यांच्या मागे पळत सुटले. काका गुरगुरत होते, "पोरंटोरं सभांना येऊ लागली! आणखी काय काय होणार आहे!"

दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही मुली ओढ्यावर पाणी भरायला गेलो, तेव्हा दुशेन पाण्यामधून पलीकडच्या बाजूस जात होते. त्यांच्याजवळ एक कुदळ, फावडं, कुऱ्हाड आणि एक जुनी बादली होती.

नंतर रोज सकाळी गावकऱ्यांना काळ्या कोटामधले दुशेन टेकडीवरच्या त्या पडझड झालेल्या तबेल्याकडे एकटे चढ चढताना दिसत. आणि अगदी रात्र होईपर्यंत ते गावाकडे खाली परत येत नसत. कित्येक वेळा ते भली मोठी काटक्यांची मोळी पाठीवर घालून वर चढताना दिसत. दुरून त्यांना पाहिले की काही जण आपल्या रिकिबींमधे पाय रोऊन ताठ होत व एका हाताने डोळे झाकत त्यांच्याबद्दल बोलत, "अरे तो पाठीवर ओझे घेतलेला तिकडे कोणी दिसतोय तो दुशेन मास्तरच आहे ना?" "होय. तोच आहे."

"बिच्चारा. मास्तरचं काम सुद्धा काही बिनकष्टाचं नाही तर!"

"तू काय समजलास? ते काम बिनकष्टाचं आहे. बघ त्याच्याकडे केवढा मोठा भारा वाहतो आहे. एखाद्या साहेबाच्या घरच्या मोलकरणीपेक्षा काही फारसा वेगळा नाही तो."

"आणि त्याच्या बोलण्यामध्ये आव तर असा की हा कोणीतरी मोठा अधिकारी आहे."

"अरे ते एवढ्याचसाठी की त्याच्याकडे तो शिक्कामोर्तब केलेला कागद आहे. त्या शिक्क्याची ताकद आहे सगळी!"

गावच्या मागच्या बाजूला डोंगराच्या पायथ्याशी आम्ही मुली रोज शेण्या गोळा करायला जात असू. एक दिवस आम्ही ठरविले की त्या जुनाट तबेल्याजवळ दुशेन मास्तर काय करीत आहेत ते तिथे जाऊन बघायचे. मातीची ही इमारत एका साहेबाची होती. तो आपल्या घोड्या तिथे ठेवायचा. थंडीमध्ये त्या घोड्या व्यायच्या. नंतर सोव्हियत सत्ता आली. तसा साहेब आपला जमीनजुमला सोडून निघून गेला. आता त्या तबेल्याच्या बाजूला कोणी फिरकतसुद्धा नाही. ती जागा काटेरी झुडुपांनी भरून गेली होती. पण आता आम्हाला काटेरी झुडुपं उखडून एका बाजूला ढीग घालून ठेवलेली दिसली. अंगण स्वच्छ केलेले दिसले. पावसाने पडझड झालेल्या भिंती मातीने चांगल्या सारवलेल्या होत्या. एकाच बिजागरीवर लोंबकळणारा वाकडातिकडा झालेला दरवाजा दुरुस्त केलेला होता. आणि आता व्यवस्थित बंद करता येत होता.



आम्ही आमची पोती खाली टाकली आणि विसावा घेण्यासाठी जमिनीवर बसलो. एवढ्यात दुशेन बाहेर आले. त्यांचं सगळं अंग चिखलानं माखलं होतं, आम्हाला पाहून ते थोडे दचकले पण नंतर आमच्याकडे पाहून हसले.

"मुलींनो तुम्ही कुठून आलात?" चेहऱ्यावरचा घाम पुसत त्यांनी विचारले.

आमच्या पोत्यांच्या बाजूला आम्ही जमिनीवर बसलो होतो. एवढ्या संकोचलो होतो की आम्हाला बोलताच येईना. लाजेने आमची जीभ टाळ्याला चिकटली आहे हे त्यांनी ओळखलं. आम्हाला जरा मोकळं वाटावं, निश्चित वाटावं म्हणून एखाद्या आमच्यातल्याच सवंगड्यासारखे डोळे मिचकावित ते आमच्याकडे पाहून हसले. आणि म्हणाले, "ही पोती तर तुमच्यापेक्षासुद्धा मोठी आहेत! तुम्ही आलात म्हणून मला खूप आनंद वाटला. शेवटी ही शाळा तुमचीच आहे ना?" ती आता जवळ जवळ तयार झालीच आहे. आताच माझी शेकोटी पण बांधून झाली आहे. त्याला एक धुराडं पण जोडलं आहे, हे पहा. आता मला थंडीसाठी लाकूडफाटा जळण जमवायचं आहे. पण ते सोपं आहे. इथे आजूबाजूस हवी तेवढी काटेरी झुडुपं आहेत. आपण जमिनीवर बसण्यासाठी खूपसं गवत पसरू आणि शिकायला सुरुवात करू. तुम्हाला काय वाटतं? शाळेत जायला आवडेल तुम्हाला?"

बाकीच्या सर्व मुलींपेक्षा मी मोठी होते. त्यामुळे मला वाटलं की मीच





उत्तर द्यायला हवं. "मी शाळेत जाईन. माझ्या काकीने जाऊ दिले तर." मी म्हटले.

"का नाही जाऊ देणार? ती नक्कीच जाऊ देईल तुला. बरं, तुझं नाव काय?" मी नाव सांगितलं.

"अल्तिनई—हे तर छान नाव आहे. आणि तू पण चांगली मुलगी आहेस. माझी खात्री आहे." ते इतकं छान हसले की माझं मन अगदी उचंबळून आलं.

"तुझे वडील काय करतात?" त्यांनी विचारलं.

मी गप्पच राहिले. मी पोरकी आहे असं सांगायला मला अगदी आवडत नव्हतं, माझी कोणी कीव करावी हेही मला पसंद नव्हते.

"ती पोरकी आहे." दुसऱ्या एका मुलीने सांगितले, "ती आपल्या काकांच्या घरी राहते."

"बरं तर, अल्तिनई" माझ्याकडे पाहून ते हसले व म्हणाले, तू तर शाळेमध्ये यायचंच, पण इतर मुलांनाही तुझ्याबरोबर आणायचं. कबूल?" "होय काका. कबूल," मी म्हटलं.

"मला मास्तर म्हणा. तुम्हाला आत येऊन बघायचं आहे? या, आत या. लाजू नका."

"नाही. आम्हाला जायला हवं. उशीर झालाय." आम्ही म्हणालो. खरं तर आम्ही बुजलो होतो. घाबरलो होतो.

"जा. पळा मग. तुम्ही शिकायला याल तेव्हा पाहालच. आणि अंधार होण्याआगोदर मीपण आणखी एक गवताचा भारा आणतो."

एक दोरी आणि कोयता घेऊन दुशेन निघाले. आम्हीही आमची पोती पाठीवर टाकून गावाकडे चालू लागलो. माझ्या मनात एकदम एक विलक्षण कल्पना आली. "मुलींनो जरा थांबा" मी म्हणाले, "आपण आपली पोती शाळेच्या अंगणात ओतून टाकूया. म्हणजे थंडीत शाळेसाठी थोडे जळण होईल."

"आणि मग घरी काय रिकाम्या हातांनी जायचं? शहाणीच आहेस."

"आपण परत आणखी शेण्या गोळा करू." मी म्हटले.

"नको. मुळीच नको. मी उशीरा गेले की आई रागवेल."

माझ्यासाठी न थांबता सगळ्या मुली निघून गेल्या.

त्या दिवशी मी जे काही केलं ते का केलं हे अजूनही मला उमगलेलं नाही. कदाचित तो केवळ हट्टीपणा असेल. किंवा बंडखोरी करण्याची प्रबळ इच्छा असेल. जन्मल्यापासूनच माझ्या साऱ्या इच्छा, आकांक्षा रागावून, थपडा मारून चिरडून टाकलेल्या होत्या! या माणसासाठी, या अनोळखी इसमासाठी, मन उचंबळून आणणाऱ्या त्याच्या हसण्यासाठी, माझ्यावर टाकलेल्या थोड्याशा विश्वासासाठी, या सगळ्यासाठी मी तशी वागले. आणि आता मला स्पष्ट दिसतं आहे, की माझं खरं जीवन, त्यातील सारा आनंद व यातना त्या दिवशी सुरू झाल्या. तेव्हा मी जे काही केलं त्यामुळे. माझ्या आयुष्यातील ती पहिलीच वेळ होती जेव्हा माझा निर्णय मी स्वतः घेतला. जे मला योग्य वाटलं ते मी न कचरता, शिक्षेची भीती न बाळगता करून टाकलं. मैत्रिणी सोडून गेल्यावर मी घाईघाईने दुशेनच्या शाळेपाशी गेले, पोत्यामधल्या साऱ्या शेण्या तिथे दरवाजाजवळ टाकून मी झाडीमधून व मोकळ्या जागेवरून शेण्या वेचण्यासाठी पळत सुटले.

मला जणू काही पंख फुटले होते. छाती आनंदाने फुलली होती. मी नुकतीच काही तरी फार छान गोष्ट केली आहे असं वाटत होतं. मी एवढी खुष का आहे हे सूर्याला समजलं असावं. मी एवढी हलकी फुलकी होऊन एवढ्या आनंदाने का पळते आहे हे सूर्याने जाणलंय अशी मला खात्री वाटत होती. कारण आज मी एक फार चांगलं काम केलेलं होतं.

डोंगरमाथ्यावर सूर्य खाली गेलेला होता. पण मला वाटत होतं की तो पूर्णपणे मावळायला तयार नाहीये. त्याला माझ्याकडे पाहत राह्यचं होतं. वाळायला लागलेल्या पिवळट गवतावर नि पानांवर त्याने उदारपणे लाल, गुलाबी आणि जांभळा रंग पसरला होता. वाळलेल्या गवताचे तुरे लवलवत्या ज्योतींसारखे लुकलुकत मागे जात होते. माझ्या ठिकठिकाणी शिवलेल्या व ढिगळं लावलेल्या कोटाची धातूची बटणं सूर्याच्या प्रकाशात चमकत होती. मी पळतच राहिले. माझं मन आनंदानं जमिनीशी, आकाशाशी, वाऱ्याशी गुणगुणत, गात होतं, "माझ्याकडे पहा! बघा मला स्वतःचाच किती अभिमान वाटतोय. मी आता अभ्यास करणार आहे. शाळेत जाणार आहे. आणि इतरांनाही शाळेत नेणार आहे!"



मी किती वेळ पळत होते कोण जाणे. पण एकाएकी मी हादरून जमिनीवर आले : आणि शेण्या? उन्हाळ्याच्या दिवसात इथे इतक्या गाई चरतात की हव्या तेवढ्या शेण्या वेचाव्यात. आणि आता त्या सगळ्या कुठे नाहीशा झाल्या? नवलच आहे! का मी शेण्या शोधल्याच नाहीत? मी जेवढी लांब पळेन तेवढ्या त्या कमीच होत आहेत. अशाने तर अंधार व्हायच्या आधी माझं पोतं भरणं कठीणच आहे. मी घाबरून गेले आणि वेड्यासारखी इकडून तिकडे जात राहिले. तरीही माझं पोतं अर्धच भरलं. ह्या वेळेपावेतो संध्याकाळचा प्रकाशही अगदी मंदावला होता. अंधार झपाट्याने सगळ्या दऱ्या खोऱ्या वेढून टाकत होता.

याआधी मी कधीच इतक्या उशीरापर्यंत घराबाहेर एकटी राहिले नव्हते. निर्मनुष्य, निःशब्द टेकड्यांना रात्रीने आपल्या पंखाखाली झाकून टाकलं. मी पार घाबरून गेले. पोतं पाठीवर टाकून मी वस्तीकडे पळत सुटले. वातावरण एवढं घाबरवून सोडणारं होतं की मला मोठ्यानं ओरडावंस वाटलं. हुंदके येऊ लागले. पण आश्चर्य म्हणजे दुशेनच्या विचारांनी मी आपलं हुंदके व ओरडणं दाबून टाकलं. मी माझ्या स्वतःवर ताबा मिळवला कसाबसा आणि कोणकोणते प्रकोप आणि भुतेखेते आपला पाठलाग करीत आहे हे पाहण्यासाठी मागे वळलेच नाही.

धुळीने माखून, घामाने डबडबून धापा लागलेली मी एकदाची घरी पोहचले. धापा टाकीत, लडखडत मी घरात शिरले. माझी काकी शेकोटीसमोर बसली होती. ती उठून तरातरा माझ्यावर धावून आली. ती एक नीच दुष्ट बाई होती.

"किती उशीर" ती ओरडली आणि मी काही बोलायच्या आत तिने माझ्या हातातलं पोतं खेचून भिरकावून दिलं. "सबंध दिवसभरामध्ये तुला या एवढ्याच शेण्या मिळाल्या?"

मला नंतर समजलं की माझ्या मैत्रिणींनी चुगली केली होती. "गचाळ काळुंद्री, त्या शाळेत जाऊन तुला करायचे तरी काय? कार्टे तिथे जाऊन मेली का नाहीस?" माझा कान पकडून तिने माझ्या डोक्यावर पुन्हा पुन्हा मारलं. "किती घाणेरडी सुस्त मुलगी आहेस तू! खरंच आहे बाकी. लांडग्याचं पिल्लू आणलं तर त्याचा घराची राखण करणारा कुत्रा कसा

होणार? इतर मुलं आपापल्या घरातील कामाला हातभार लावतात आणि तू चुकून सुद्धा काही करायची नाहीस. कशी शाळेला पळतेस पाहतेच मी. पुन्हा त्या बाजूला फिरकताना दिसलीस तर तुझी तंगडीच मोडून टाकेन. त्या शाळेची अशी अद्दल घडवेन की जन्मात विसरणार नाहीस.''

मी काहीच बोलले नाही. केवळ कण्हणं, विव्हळणं दाबून टाकायचा प्रयत्न केला. नंतर मी शेकोटीसमोर बसले—शेकोटीतील निखारे हलवायचं काम अर्थात मलाच करायचे असे—आणि जराही आवाज न काढता रडले, माझ्या भुऱ्या मांजरीला कुरवाळत. मला काही झालं तर तिला लगेच समजायचं आणि ती माझं सांत्वन करायला माझ्या मांडीवर टुणकन् उडी मारून बसायची. मला रडू येत होतं ते काकीनं मला मारलं म्हणून नव्हे; त्याची तर मला सवय झाली होती. खरं कारण होतं ती मला कधीच शाळेत जाऊ देणार नाही हे.

नंतर दोन दिवसांनी अगदी पहाटे पहाटेच गावभर कुत्री जोराजोरानं भुंकायला लागली. आणि बरेच जण तावातावाने बोलायला लागले. त्याचं कारण होतं दुशेन. तो घरोघर जाऊन मुलांना शाळेत नेण्यासाठी गोळा करायला लागला होता. त्या काळी आमच्या गावामध्ये रस्ते-बिस्ते काही नव्हतेच. आमच्या काळपट मातीच्या झोपड्या अस्ताव्यस्तपणे हव्या तिथे बांधलेल्या होत्या. ज्याने त्याने लहर येईल तिथे आपापली झोपडी बांधून टाकायची. दुशेनच्या अवतीभोवती मुलांचा घोळका होता, आणि तो एका मागोमाग एकेका कुटुंबाला भेटत चालला होता.

आमचं घर होतं अगदी टोकाला. मी आणि माझी काकी उखळीमध्ये मिलेट कांडत होतो. काका कोठाराच्या बाजूच्या भोकामधून गहू उपसत होते. गटू न्यायचे होते बाजारात विकायला. लोहार जसे आळीपाळीने घण मारतात तसंच माझं व काकीचं मुसळ एकानंतर एक खाली येत होतं. पण माझं लक्ष होतं रस्त्याकडे, जिथे दुशेन जाईल तिथे. आमच्या शेवटच्या घरापर्यंत तो येतो की नाही याची धागधूक मनात होती. काकी शाळेत जाऊ देणार नाहे हे माहीत असून सुद्धा दुशेनने मी कुठे राहते ते तरी पहावं असं मला वाटत होतं. आमचं घर लागायच्या आधीच त्याने परत फिरू नये अशी मी मनोमन प्रार्थना करीत होते.



''राम राम ताई, देव तुमच्या कामात तुम्हाला मदत करो! आणि त्यानं नाही केली तर ही आमची फलटण आहे बरं का मदत करायला. बघा तरी आम्ही किती जण आहोत.'' दुशेननं हसत हसत माझ्या काकीला सांगितलं.

''हं'' काकी तोंडातल्या तोंडात पुटपुटली. आणि काकांनी तर त्याच्याकडे ढूंकून पाहिलंही नाही.

या स्वागताने दुशेनचा बिलकुल विरस झाला नाही. अंगणात मधोमध पडलेल्या एका ओंडक्यावर तो बसला आणि कागद-पेन्सिल बाहेर काढीत म्हणाला, ''आम्ही आजपासून शाळा सुरू करीत आहोत. तुमची मुलगी किती वर्षांची आहे?''

माझ्या काकीनं उत्तर दिलंच नाही आणि उलट जोरजोराने मुसळ आपटून आपला राग दाखवू लागली. ती त्यांच्याशी बोलणार नाही हे उघडच होतं. मी चुळबुळ करू लागले. आता काय होणार? दुशेननं माझ्याकडे पाहिलं आणि हसले. पुन्हा माझं मन उल्हसित झालं.

''अल्तिनई तू किती वर्षांची आहेस?'' त्यांनी मलाच विचारलं.

उत्तर द्यायची मला कुठे हिम्मत होती.

''तुला त्याच्याशी काय करायचं आहे? आणि तू कोण होतोस,'' माझ्या काकीने चिडखोरपणानं विचारलं, ''तिला शाळेत बिळेत जायला फुरसत नाही. आईबाबांच्या घरी असणाऱ्या मुलीसुद्धा लिहायला-वाचायला शिकत नाहीत. या गलिच्छ कार्टीला कोण पाठवणार? एवढा मोठा घोळका गोळा केला आहेत तो सांभाळा आणि जा तुमच्या शाळेत. इथे तुमची डाळ शिजायची नाही.''

दुशेन एकदम उठून उभे राहिले आणि त्यांनी ठणठणीत आवाजात विचारलं, ''काय बोलताय तुम्ही? ही बिचारी पोरकी आहे त्यात तिचा काय दोष? आणि पोरक्या मुलांनी शिकायचं नाही असा काही कायदा आहे का?''

''तुमच्या कायद्याची मला काडीची पर्वा नाही. इथे माझा कायदा चालतो. तुम्ही मला हुकूम करायचा नाही.''

''आपल्या सगळ्यांना एकच कायदा लागू होतो. तुम्हाला ही मुलगी नकोशी झाली असेल. पण आम्हाला ती हवी आहे. सोव्हियत देशाला हवी

आहे. तुम्ही आडथळा आणलात तर आम्ही सुद्धा कायद्याचा बडगा दाखवू."

"आलाय मोठा दादा! जरा पहा तर त्याच्याकडे!" कमरेवर हात ठेवून माझी काकी लढाईच्या पवित्र्यामध्ये उभी राहिली. "कोण शेंबडं पोर यांचे हुकूम मानणार? तिला कोण पोसतं आहे? तू का मी? आवारा बापाचा आवारा मुलगा तू. तुला ना घर ना दार!"

एवढ्यात माझे काका कोठारातून बाहेर आले म्हणून बरं, नाहीतर या वादावादीचा शेवट कसा झाला असता कोण जाणे! या घराचा मुख्य तिचा नवरा आहे याकडे दुर्लक्ष करून काकी जेव्हा नको त्या बाबतीमध्ये ढवळाढवळ करी तेव्हा काकांना संताप येई. कधीकधी ते तिला खूप मारपीट करायचे. आतासुद्धा तसंच काहीसं दिसत होतं, "एक बये चूप बसते का नाही" ते गरजले. "तूच या घराची मुख्य. आणि चांगलं काय आणि वाईट काय हे तूच ठरवायचंस असं समजतेस काय? काम कर मुकाट्यानं. बडबड बंद कर. आणि तू रे ताशतनबेकच्या मुला त्या कार्तीला घे आणि काय शिकवायचं ते शिकव, नाहीतर भाजून खाऊन टाक तिला. काय हवं ते कर. पण माझ्या अंगणातनं चालता हो. चल नीघ इथून."

"म्हणजे तुम्ही तिला भटकायला मोकाट सोडणार. आणि मला घरकामात कोण मदत करील? कोण सांगा नं." माझी काकी आरडाओरडा करू लागली. पण काकांनी मोठ्यानं ओरडून तिला गप्प केले, "ए तोंड बंद कर पाहू."

प्रत्येक काळ्या ढगाला रुपेरी कड असते असं म्हणतात. ते खरंच आहे. हा वर वर्णन केलेला सगळा तमाशा झाला आणि मी शाळेत जायला लागले.

तिथे पोहचल्यावर दुशेननं जमिनीवर खूपसं गवत पसरून आम्हाला त्यावर बसायला सांगितलं, आम्हाला प्रत्येकाला एक वही, पेन्सिल व लहानसा पुठ्ठा दिला.

"तो पुठ्ठा तुमच्या मांडीवर ठेवा आणि त्यावर वही ठेवा. त्यामुळे तुम्हाला लिहिणं सोपं जाईल." त्यांनी समजावलं.

त्यानंतर भिंतीवर अडकविलेल्या एका चित्राकडे त्यांनी आमचं लक्ष वेधलं, ते चित्र एका रशियन माणसाचं होतं.

"हे आहेत लेनिन," दुशेन म्हणाले.



"ते चित्र मी कधीच विसरणार नाही. काय असेल ते असो. पण तसं चित्र मला पुन्हा कुठेच दिसलं नाही. आणि माझ्या स्वतःपुरतं मी त्याला दुशेनचं चित्रच अजूनही मानते. त्या चित्रामध्ये लेनिन यांनी एक सैलसे सैनिकांचे जाकीट घातले होते. काहीसा चिमटलेला चेहरा आणि लांब दाढी होती. दुखापत झालेला एक हात स्लिंगमध्ये अडकवलेला होता. टोपी थोडी मागे सारलेली होती. त्यांचे डोळे चलाख असून सुद्धा ते आम्हाला सांगत होते, "मुलांनो, किती सुंदर भविष्य तुमच्या पुढे आहे ते तुम्हाला समजलं तर!" त्या शांत क्षणांमध्ये मला वाटलं की लेनिन खरोखरच माझ्याच भविष्याचा विचार करीत आहेत.

हे चित्र दुशेन यांच्याकडे बरेच दिवस असावे. पोस्टरसाठी वापरतात तशा स्वस्त कागदावर ते छापलेले होते. त्याच्या कडा आणि घड्या झिजलेल्या होत्या. भिंतीवर आणखी काहीच नव्हते. हे एवढे एकच चित्र!

"मी तुम्हाला वाचायला व अंक मोजायला शिकविणार आहे. अक्षर व आकडे कसे लिहायचे तेही आपण शिकू या." दुशेन म्हणाले, "मला जे जे येतं ते सारं मी तुम्हाला शिकवेन."

त्यांना येत होते तेवढे सर्व त्यांनी खरोखरच आम्हाला शिकवून टाकले. आमच्या बरोबरचा त्यांचा सहनशीलपणा थक्क करणारा होता. पेन्सिल कशी धरायची हेसुद्धा त्यांना आम्हाला शिकवावं लागलं. आम्हाला माहीत नसलेल्या सगळ्या शब्दांचे अर्थ ते आम्हाला नीट समजावून सांगत.

आता त्यांचा विचार मनात आला की मी आश्चर्यचकित होते. स्वतःच शिक्षणापासून वंचित असलेल्या त्या तरुणाचं केवढं धाडस! त्यांना जेमतेम वाचता येत होतं. पाठ्यपुस्तकांचा तर पत्ताच नव्हता. एखादे बाळबोध वाचनासारखे पुस्तकही नव्हते. या सगळ्या गोष्टींविना शिक्षणाचं महान कार्य करायचं! ज्यांचे बापजादेही कधी शिकले नाहीत अशा आम्हा मुलांना शिकवायचं म्हणजे काही सोपी गोष्ट नव्हे. दुशेनना स्वतःला सुद्धा व्याकरण येतच नव्हतं. आणि शिकविण्याची पद्धती म्हणून काही असतं याची तर कल्पनाही नव्हती. अशा काही गोष्टी असतात याची त्यांच्या मनामधे शंका सुद्धा आली नव्हती.

त्यांना जेवढं चांगलं शिकवायला जमलं तेवढं त्यांनी आम्हाला शिकविलं.





जे जे माहीत असायला हवं असं त्यांना वाटलं ते ते त्यांनी आम्हाला समजावलं, केवळ आपल्या अंतःप्रेरणेवर विसंबून! परंतु ज्या कळकळीने व उत्साहाने त्यांनी आपलं कर्तव्य बजावलं ते मुळीच वाया गेलं नाही. त्याचा आमच्यावर नक्कीच चांगला परिणाम झाला याची मला खात्री आहे.

ते समजत होते त्यापेक्षा कितीतरी जास्त त्यांनी साध्य केलं होतं. त्यांच्या शाळेमध्ये, त्या पडक्या तबेल्यामध्ये, भिंतीच्या भगदाडांमधून बर्फाळ डोंगरमाथे पाहत, आपल्या गावाच्या बाहेर पाऊल न टाकलेल्या आम्हा किरगीझ मुलांना त्यांनी एकदम एका नव्याच आश्चर्यकारक जगाचे ओझरते दर्शन करून दिले.

तिथेच आम्हाला कळालं की मॉस्को नावाचं एक मोठं शहर आहे. तिथे लेनिन राहतात. हे शहर औलिये आटा किंवा ताश्कंदपेक्षा कितीतरी पट मोठं आहे. जगामध्ये तलास व्हॅलीएवढे मोठमोठे समुद्र असतात आणि त्यामध्ये आमच्या इथल्या डोंगरांएवढ्या मोठ्या बोटी पाण्यामधून प्रवास करीत असतात. आम्ही बाजारामधून जे घासलेट आणतो ते जमिनीच्या आत अगदी खोलवर साठलेलं असतं. आम्हाला अगदी खात्री वाटायची की आमच्या लोकांची स्थिती जेव्हा थोडी सुधारेल तेव्हा आमची शाळा एका मोठ्या पांढऱ्या इमारतीमध्ये भरेल. तिथे मोठ्या खिडक्या असतील आणि विद्यार्थ्यांसाठी मेज व बाकं असतील.

मुळाक्षर नीट लिहिता येऊ लागताच आम्ही पहिला शब्द लिहिला—लेनिन. आमच्या राजकारणाच्या शब्दावलीमधल्या संकल्पना होत्या; श्रीमंत सरदार (bey), भाडोत्री मजूर (hired labourer), आणि प्रतिनिधी मंडळे (Soviets). वर्ष संपायच्या आत दुशेन आम्हाला क्रांती (revolution) लिहायला खात्रीने शिकविणार होते.

दुशेनचे बोलणे ऐकताना आम्हाला वाटायचं आम्ही जणू त्यांच्या खांद्याला खांदा लावून 'व्हाईट गार्डांशी' लढतो आहोत. लेनिनचं त्यांनी केलेलं वर्णन एवढं प्रेरणादायी असायचं की जसं काही त्यांनी लेनिनना स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलंय. आता मला जाणवतं आहे की त्यांनी आम्हाला जे काही सांगितलं ते म्हणजे आमच्या थोर पुढाऱ्यांविषयी लोकांच्यात प्रचलित असलेल्या आख्यायिका होत्या. पण आमच्यासाठी त्या पूर्णपणे सत्यकथा होत्या.

"तुम्ही लेनिनशी हस्तांदोलन केलं आहे का?" एकदा आम्ही त्यांना विचारलं. "नाही रे बाळांनो, मी कधीच त्यांना पाहिलं नाही" ते उसासा टाकीत ओशाळवाणेपणाने म्हणाले. जणू काही त्यांनी आम्हाला फसवलं होतं.

प्रत्येक महिन्याच्या अखेरीस दुशेन प्रादेशिक केंद्रामध्ये आपल्या कामाचा आढावा देण्यास जात. ते पायी जात असत. त्यामुळे २-३ दिवसांनी परतायचे.

त्या अवधीत आम्हाला अगदी चुकल्याचुकल्यासारखं व्हायचं. माझा एखादा मोठा भाऊ असता तर त्याची सुद्धा एवढी आठवण होत राहिली नसती. माझ्या काकीचं लक्ष चुकवून मी घराच्या मागच्या बाजूस जायची आणि खालच्या बाजूस असलेल्या रस्त्याकडे डोळे लावून बसायची. आतुरतेनं दुशेन परत येत असताना पाहण्यासाठी, हृदय उचंबळून आणणारं त्यांच्या चेहऱ्यावरचं स्मित बघण्यासाठी आणि डोक्यात प्रकाश पाडणारे त्यांचे शब्द ऐकण्यासाठी.

त्यांच्या विद्यार्थ्यांमध्ये मी वयाने सर्वात मोठी. म्हणून बहुधा मी इतरांच्या मानाने पटकन् शिकत असे. याचं एवढं एकच कारण नाही. त्यांनी उच्चारलेला प्रत्येक शब्द, त्यांनी शिकविलेलं प्रत्येक अक्षर मला पचित्र, आदरणीय होतं. जे जे ते शिकवीत त्या सर्वाचं पूर्ण आकलन करून घेणं यापेक्षा जास्त महत्त्वाचं माझ्या जीवनात काहीच नव्हतं. त्यांनी दिलेली वही मला फार मोलाची आहे. ती मी मोठ्या आस्थेनं जपून ठेवली आहे. कोयत्याच्या टोकाने जमिनीवर मी अक्षरं गिरवायची, मातीच्या भिंतींवर कोळशाने लिहायची नाहीतर बर्फामध्ये वा धुळीमध्ये काडीने काढायची. माझ्यासाठी दुशेन यांच्यापेक्षा शहाणा व शिकलेला माणूस साऱ्या दुनियेत असणं शक्य नव्हतं.

आता थंडीचा मोसम जवळ येत चालला होता. पहिला हिमवर्षाव होईपर्यंत आम्ही त्या खळखळणाऱ्या ओढ्याच्या पाण्यामधून पकीकडे जात असू. टेकडीच्या पायथ्याशी वाहणाऱ्या या ओढ्याच्या तळाचे दगडगोटे दिसायचे. अखेरीस बर्फाळ पाणी एवढं थंड झालं की ते आमच्या पायांना डंख करायचं. आणि तो ओढा पार करणं आम्हाला अशक्य झालं. लहान



मुलांना तर पाणी इतकं झोंबायचं की त्यांच्या डोळ्यांना पाणी येई. एकाला पाठीवर घेऊन आणि दुसऱ्याला हाताने उचलून दुशेन एकावेळी दोघा दोघा मुलांना पलीकडे किनाऱ्यावर पोहचवीत. आता या सर्वावर विश्वास ठेवणंही कठीण आहे. इतकी ही अशक्य कोटीतील गोष्ट आहे. दुशेनकडे पाहून लोक त्याला हसायचे. ते अज्ञानी होते नाहीतर मूर्ख होते. थंडीमध्ये डोंगरमाथ्यावर राहून, क्वचित पिठाच्या गिरणीसाठी खाली उतरणारे श्रीमंत लोक फारच किळसवाणे वागत. डोक्यावर कोल्ह्याच्या कातड्याची लाल टोपी, अंगावर मेंढीच्या कातड्याचे कोट अशा थाटामध्ये आपल्या तुकतुकीत उबदार घोड्यांवर बसून जाताना मुलांना पलिकडच्या काठावर नेणाऱ्या दुशेनना न्याहाळायचे. त्यांच्याकडे बोट दाखवीत हसायचे आणि काहीबाही बडबडायचे : "काय दैव पहा? हा माणूस मला आधी दिसला असता तर त्याला मी झकास दुसरी बायको म्हणून घरी नेला असता." मोठमोठ्याने खिदळत आणि आमच्या अंगावर पाणी आणि चिखल उडवीत ते पुढे निघून जायचे.

मला राग अनावर व्हायचा, असं वाटायचं की या मूर्खांच्या घोड्यांच्या रिकीबी खेचून घ्याव्यात आणि त्यांच्या चिकण्या, टवाळखोर चेहऱ्यांवर मोठ्यानं खेकसावं, "शरम नाही वाटत तुम्हाला आमच्या गुरुजींबद्दल असलं घाणेरडं बोलायला? एवढी तुमची हिंमत! किती मूर्ख, अधम आहात तुम्ही."

परंतु एका मुलीचं हे बोलणं कोणी ऐकेल का? तेव्हा मी नुसती आपलं दुःख गिळून तिथे उभी राहत असे. दुशेन असं दाखवायचे की त्यांनी काही ऐकलंच नाही. त्यांच्या अपमानास्पद बोलण्याकडे ते पूर्ण दुर्लक्ष करायचे. एवढंच नव्हे तर त्यांना चटकन एखादी मजेदार गोष्ट सुचायची आणि ते आम्हाला हसवायचे. आम्ही घडलेला प्रसंग त्यात विसरून जायचो.

दुशेननी आटोकाट प्रयत्न केले पण त्यांना ओढ्यावर पूल बांधायला लाकूड काही मिळालं नाही. एक दिवस शाळा सुटल्यानंतर मुलांना अलिकडच्या काठावर आणून झाल्यानंतर ओढा पार करायला दगड-गवताची पाऊल वाट बांधण्यासाठी दुशेन आणि मी मागे थांबलो.

गावकऱ्यांनी पूल बांधायचं ठरविलं असतं तर हे काम अवघ्या अर्ध्या तासामध्ये झालं असतं. दोन-तीन झाडं कापून ओढ्यावर आडवी टाकायची.

म्हणजे झाला पूल तयार, ह्या काठावरून त्या काठावर जायला. पण आमच्या अडाणी लोकांना तेव्हाच्या काळात शाळेचं महत्त्वच समजत नव्हतं. त्यांच्या मते दुशेन म्हणजे एक वेडपट माणूस होता. उगाच रिकामटेकडा पोराटोरांच्यात वेळ घालवत होता. त्याला शिकवायचं आहे ना, मग शिकवू दे. नसेल शिकवायचं तर पाठवून द्यावे घरी पोरांना. ही त्यांची शाळेकडे बघण्याची प्रवृत्ती होती. तेथील पुरुष मंडळींकडे आपापले घोडे असायचे. मग पूल हवाच कशाला? त्यांनी जरा थांबून विचार करायला हवा होता; सर्व दृष्टीने त्यांच्याइतकीच योग्यता असलेला हा होतकरु तरूण मुलांना शिकविण्यासाठी एवढी धडपड का करतो आहे? इतक्या खंबीरपणाने, इतक्या जिद्दीने, कोणत्याही संकटांना, परिश्रमांना, हेटाळणीला व अपमानांना न जुमानता हा शिकविण्याचं काम एवढ्या निष्ठेने का चालू ठेवतो?

पाऊलवाट करायसाठी आम्ही दगड रचले त्या दिवशी जमिनीवर बर्फ पडले होते. पाणी तर इतकं थंड होतं की तुमचा श्वास रोखला जाईल. ह्या सगळ्याला दुशेन कसे तोंड देत होते मला समजत नाही. ते अनवाणी काम करत होते आणि त्यांनी क्षणभरही उसंत घेतली नाही. ओढ्याच्या तळावर पाय टेकायचा म्हणजे यमयातना होत्या; रसरशीत लाल निखाऱ्यांवर पाऊल ठेवल्यासारखे वाटायचे. अर्धमुर्ध काम झालं आणि माझ्या दोन्ही पायामध्ये एकाएकी गोळे आले. यातनांनी मी एकदम वाकून गेले. मला धड ओरडता येईना की ताठ होता येईना. मी आणखीनच वाकत चालले पाण्यामध्ये! दुशेन धावत पळत माझ्याकडे आले. मला उचलून घेऊन त्यांनी काठावर आणून बसवलं. आपला पायघोळ कोट काढून त्यांनी मला बसण्यासाठी जमिनीवर अंथरला. माझ्या बधीर झालेल्या काळ्यानिळ्या पायांना त्यांनी आपल्या हातांनी चोळले. माझ्या थंड पडलेल्या हातांना मालीश केलं आणि त्यांना स्वतःच्या श्वासोच्छवासाने ऊब आणली.

"माझ्या कोटामध्ये गुरफटून थोडा वेळ बैस इथे अल्तिनई." ते मोठ्या आस्थेने म्हणाले. "मला एकट्यालाच माझं काम पुरं करता येईल."

शेवटी एकदाची पायवाट तयार झाली. दुशेन पाण्यातून बाहेर आले, बुटामध्ये पाय घालून बूट वर ओढले. त्यांच्याच कोटामध्ये गुरफटून बसलेल्या माझ्याकडे पाहून हसले, आणि म्हणाले, "आता थोडी ऊब आली का? किती मदत करतेस मला! हे बघ जरा नीट गुंडाळ पाहू कोट स्वतःभोवती." जरा वेळाने त्यांनी विचारले, "त्या दिवशी शाळेच्या दाराशी शेण्या कोणी आणून टाकल्या होत्या? तूच ना अल्तिनई?" "हो" मी म्हणाले.

"वाटलंच होत मला." किंचित हसल्यासारखे त्यांच्या ओठांचे कोपरे विलग झाले.

मला आठवतंय. माझ्या चेहऱ्यावर लाली पसरली. कारण त्यांना कळलं होतं. इतकी क्षुल्लक गोष्ट पण ते विसरले नव्हते. मी खूप खुष झाले. अगदी सातव्या स्वर्गात पोहचले आनंदाने. हे दुशेनच्याही लक्षात आलं.

"पोरी तू अगदी निर्मळ झऱ्यासारखी आहेस." आपल्या नजरेनं ते मला गोंजारत होते. "आणि इतकी हुशार पण...बस् तुला शहरातल्या शाळेत पाठवता यायला पाहिजे. कुठल्या कुठे पोचशील तू मोठी झाल्यावर!"

ते एकाएकी वळले आणि काठाशी जाऊन उभे राहिले. त्या खळखळणाऱ्या ओढ्याच्या काठावर डोक्याच्या मागे हात धरून उभे राहिलेले दुशेन अजूनही मला दिसतात. डोंगरावरच्या वाऱ्याने पळणाऱ्या ढगांना त्यांचे पाणीदार डोळे न्याहाळत होते. त्या क्षणी ते कसला विचार करीत असावेत? मला शहरातील शाळेत पाठविण्याचा? आणि त्यांचा उबदार कोट गुरफटून मी विचार करीत होते, "दुशेन माझे भाऊ असते तर! मी त्यांच्या बाहूच्या विळख्यात घुसले असते, त्यांना घट्ट मिठी मारली असती आणि डोळे मिटून त्यांच्या कानात काहीतरी प्रेमळपणाने पुटपुटले असते. देवा माझ्यावर कृपा कर; दुशेनना माझा दादा बनव!"

मला वाटतं दुशेन त्यांच्या कनवाळु स्वभावामुळे आम्हा सर्वच मुलांना फार आवडत. आमच्यासाठी काय काय स्वप्नं त्यांनी पाहिली होती. आम्ही लहान असलो तरी आम्हाला या सर्वाचं कौतुक वाटे. तसं नसतं तर आम्ही एवढ्या लांब रोज चालत शाळेत कशाला गेलो असतो? अंगाला झोंबणाऱ्या वाऱ्यामध्ये धापा टाकीत टेकडी कशाला चढलो असतो? बर्फाचे जाडजूड थर कशाला तुडविले असते? आम्ही आमच्या मर्जीने शाळेत जात होतो. आमच्यावर कोणाचीच सक्ती नव्हती, त्या बर्फाळ तबेल्यात जाऊन कुडकुडत बसायची! तिथे एवढी थंडी असे की आमच्या श्वासामधली वाफ गोठायची.

आमच्या चेहऱ्यावर, हातांवर, कपड्यांवर पडायची. आम्ही पाळीपाळीने ऊब येण्यासाठी शेकोटीजवळ जायचो व बाकीचे दुशेनचे बोलणे ऐकत शांत बसायचे.

जानेवारी महिन्याच्या अखेरीस अशाच एका गोठवून टाकणाऱ्या सकाळी दुशेन नेहमीप्रमाणे आम्हा मुलांना न्यायला आले. ते अजिबात बोलत नव्हते. त्यांचा चेहरा उग्र वाटत होता, काळा आणि कडक, लोखंडाच्या साच्यातून काढल्यासारखा. आमचे गुरुजी असे कधीच दिसले नव्हते यापूर्वी. काहीतरी फार बिनसलंय हे आम्हाला जाणवत होतं, आम्ही गुपचुप मेंढरांसारखे त्यांच्या मागोमाग गेलो.

जेव्हा बर्फाचे रस्त्यावर ढीग साचायचे तेव्हा दुशेन आधी पुढे जायचे. त्यांच्यामागून मी जायची व इतर मुले एकामागून एक रांगेनं यायची. त्या दिवशी असंच झालं. रात्रभरात टेकडीच्या पायथ्याशी खूप बर्फ साठलं होतं. कधी कधी माणसाची पाठमोरी आकृतीसुद्धा त्याची मनस्थिती कशी आहे हे सांगते. त्या दिवशीही आमच्या चटकन् लक्षात आलं की आमचे गुरुजी पार खचून गेले आहेत, दुःखाने वाकले आहेत. दुशेननी मान खाली घातली होती, आणि पाय जणू बळेबळे फरपटत नेत होते. पांढऱ्या बर्फामधील काळ्या कोटातले दुशेन थकलेले, खचलेले—तो अभद्र आकृतीबंध अजून माझ्या डोळ्यासमोर उभा राहतो. टेकडी चढताना समोर काळ्या कोटातले, पाठीत वाकलेले दुशेन माझ्यासमोर, थोड्या वरच्या बाजूस बसलेल्या उंटासारखे पांढऱ्या बर्फाचे ढीग, त्यांच्या पाठीवरून बर्फाचे कण गरगर उडवीत नेणारा वारा आणि त्याच्याही वर पांढुरकं नीरस आकाश व त्यात तरंगणारा एकुलता एक ढग! सारंच कसं अमंगळ खिन्न!

शेवटी आम्ही शाळेत पोहचून गवतावर बसलो तेव्हा दुशेन यांनी नेहमीसारखी अगोदर शेकोटी पेटविली नाही.

'उठा आणि उभे राहा'. त्यांनी आम्हाला हुकूम दिला, आम्ही उभे राहिलो. 'तुमच्या टोप्या काढा.'

मुकाट्याने आम्ही आमच्या टोप्या काढल्या. त्यांनीही आपली उंच टोपी काढली. आम्हाला काहीच समजत नव्हतं, काय होतंय ते. मग कापऱ्या, घोगऱ्या आवाजात ते बोलले, ''लेनिन मरण पावले आहेत. त्यामुळे जगभर लोक हळहळले आहेत. दुःख व्यक्त करीत आहेत. तुम्हीसुद्धा आहात तिथेच स्तब्ध उभे राहा. बोलू नका. या चित्राकडे पहा आणि आजचा दिवस नीट ध्यानात ठेवा.''



आमच्या शाळेच्या खोलीमध्ये एवढी शांतता पसरली की जणू काही ती बर्फात गाडली गेली आहे. भिंतींच्या फटींमधून वारा आत घुसल्याचा आवाजसुद्धा स्पष्ट ऐकू येत होता. बर्फ पडताना गवताच्या पात्यांनी केलेली सळसळ ऐकू येत होती.

गजबजलेली शहरं गप्प झाली होती, कारखान्यांचे जमीन हादरवणारे आवाज थंड झाले होते, वेगाने धावणाऱ्या आगगाड्या रूळावर जेथल्या तेथे स्तब्ध उभ्या राहिल्या होत्या, सारं जग मूकपणे शोक करीत होते. अशा दुःखद वेळी अफाट जनसागराचा एक जलकण असलेली आम्ही मुलंही गंभीर शांततेमध्ये आमच्या शिक्षकाबरोबर उभे होते. गोठून टाकणाऱ्या त्या शाळा नामक तबेल्यामध्ये लेनिनना अखेरचा निरोप देत होतो. मनोमनी समजत होतो की आमच्यासारखे लेनिन यांच्याशी इतकी जवळीक असलेले आम्हीच आहोत. आणि त्यामुळे आमच्या इतके दुःखीही आम्हीच आहोत. आमच्या समोर आमचे लेनिन होते; आपल्या अघळपघळ जाकिटामध्ये एक हात गळ्याभोवतीच्या पट्ट्यामध्ये अडकवलेले, आणि नेहमीप्रमाणे भिंतीवरून आमच्याकडे पाहणारे. आणि नेहमीसारखे ते आमच्यावर विश्वास असणाऱ्या आपल्या निर्मळ डोळ्यांनी आमच्याशी बोलत होते, ''मुलांनो, बस् तुम्हाला आपल्या (उज्वल) भविष्याची जाण व्हावी!'' आणि त्या शांत वेळेस मला खरोखर असं वाटलं की ते माझ्याच भविष्याचा विचार करीत आहेत.

मग दुशेनने आपल्या बाहीने डोळे पुसले आणि म्हणाले, ''मला स्थानीय केंद्राच्या ठिकाणी जायला हवं. मी पक्षाचा सभासद होणार आहे. आणि मला परत यायला तीन दिवस लागतील.''

त्या तीन दिवसात आतापर्यंतची सर्वात जास्त कडाक्याची थंडी होती. जणू काही या थोर माणसाच्या जाण्याने निर्माण झालेली पोकळी भरून काढण्यासाठी निसर्गाच्या सर्व महाशक्ती प्रयत्न करीत आहेत. सोसाट्याचा वारा घळींमधून घोंघावत होता; हिमवादळांनी उग्र स्वरूप घेतलं होतं; बर्फ धातूच्या पत्र्यावर आपटल्यासारखे खणखणत होते; पंचमहाभूते शांत व्हायला

तयारच नव्हती, वारे निराशेने वेड लागल्यासारखे बर्फ गरगर फिरवीत होते आणि मुसमुसत जमिनीवर आपटीत होते...

खाली लोंबकळणाऱ्या काळ्या ढगांमधून पर्वतांची शिखरं मळकट आकाशात वर गेलेली होती, आणि या पर्वतांच्या पायथ्याशी आमचं गाव चुपचाप वाकून पाय पोटाशी दुमडून बसलं होतं. धुराड्यांमधून धुराचे लहान लहान लोट बाहेर येत होते. सर्वजण घरांच्या आत बसून होते. भरीत भर म्हणून लांडग्यांचा कहार सुरू झाला होता. दिवसाढवळ्या ते रस्त्यांवर दिसू लागले. आणि रात्री दबकत दबकत अगदी गावाजवळ फिरू लागले. त्यांचं भुकेलं, रक्त गोठवून टाकणारं ओरडणं सूर्य उगवेपर्यंत ऐकायला यायचं.

मला गुरुजींची फार काळजी वाटत होती. इतकी कडाक्याची थंडी आणि त्या सैन्यातल्या कोटाखेरीज त्यांच्याजवळ काहीच नव्हतं. फरचा कोटसुद्धा नव्हता. ते ज्या दिवशी परत यायचे होते त्या दिवशी तर माझी फार घालमेल झाली. मला संकटाची चाहूल लागली होती. मी सारखी सारखी घराबाहेर जाऊन बर्फाने सारवलेल्या निर्मनुष्य कुरणाकडे डोळे फाडून बघत होते. पण तिथे चिटपाखरूही दिसत नव्हतं.

"गुरुजी, तुम्ही आहात तरी कुठे? माझी विनवणी ऐका. आता जास्त उशीर करू नका. लवकर परत या. आम्हाला तुमची फार आठवण येत आहे. गुरुजी तुम्ही ऐकत आहात ना? आम्हाला फार आठवण येतेय!"

माझ्या निःशब्द रडण्याशी कुरणाला काहीही कर्तव्य नव्हतं. मी रडतच राहिले? का रडले कळत नाही. माझ्या सारखं सारखं आत-बाहेर करण्याने काकी चिडली, "त्या दाराला हात लावू नको. बैस एका जागी आणि सूत कातायला लाग. तुझ्या दार उघडण्याने माझं घर गोठून जाईल आणि मुलं मरायला टेकतील," मुठी आवळीत ती माझ्यावर खेकसली. माझं बाहेर जाणं बंद झालं.

आता अंधार झाला होता आणि दुशेन परत आले की नाही काहीच पत्ता लागत नव्हता. काहीच कळेना त्यामुळे मी अगदी उतावीळ झाले. एक क्षण मी स्वतःला समजावून सांगायची की ते सुखरूप आलेच असणार कारण सांगितलेल्या दिवशी ते आले नाहीत असं कधीच झालं नव्हतं. पण दुसऱ्या क्षणी माझं मन भरकटायचं : त्यांची प्रकृती बरी नव्हती. त्यांचं



चालणं मंद झालं होतं, कठीण झालं होतं. कुरणामध्ये हिमवादळ सुरू झालं तर ते वाट चुकतील. असंच काही बाही. माझं कामात लक्ष लागेना. बोटं बोथट झाली होती. धागा एकसारखा तुटत होता. आता मात्र माझी काकी चवताळली.

"तुला झालंय तरी काय आज? तुझ्या बोटांची लाकडं झाली आहेत की काय?" ती माझ्यावर कावली. तिचा राग वाढतच चालला. शेवटी तिचा संयम सुटला आणि ती त्रासून ओरडली, "हाय रे देवा! ही प्लेग होऊन मरत का नाही? चल ऊठ, ही पिशवी घे आणि तुझ्या सईकल आजीकडे नेऊन दे. ती त्यांचीच आहे."

मी आनंदाने एकदम उडीच मारली. सईकल आजींच्याकडेच तर दुशेन राहत असत. सईकल आजी आणि कर्तनबाय आजोबा माझ्या आईकडून माझे लांबचे नातेवाईक होते. एके काळी मी त्यांच्याकडे वरचेवर जात होते आणि रात्री राहत पण होते. माझ्या काकीला कदाचित हे आठवलं असेल. किंवा देवानेच तिला मला आजीकडे पाठवण्याची बुद्धी दिली असेल.

"दुष्काळमध्ये ओटचं पीठ खाऊन खाऊन लोक जसे उबतात तसं मला तुझ्या चेहऱ्याकडे पाहून कससंच व्हायला लागतं. त्यांनी ठेवून घेतलं तर रात्री तिथेच राहा. नाहीशी हो आता इथून एकदाची आणि यायची घाई अजिबात नको."

मी पटकन बाहेर पडले. सोसाट्याचा वारा सुटला होता. स्वतःवरच्याच रागानं गळा आवळल्यासारखा क्षणभर थांबायचा आणि लागलीच दुसऱ्या क्षणी तुमच्यावर तुटून पडायचा, तुमच्या गरम चेहऱ्यावर झोंबणाऱ्या बर्फाच्या ओंजळी फेकत! आजीची झोळी हाताखाली घट्ट दाबून मी गावाच्या दुसऱ्या टोकाकडे पळत सुटले. घोड्याच्या टापांच्या बर्फात उमटलेल्या ताज्या खुणा वाट दाखवायला होत्या. एकच एक विचार माझं मन कुरतडत होता : "ते परत आले असतील?"

नाही. ते अजून आले नव्हते. मी आजीच्या घरात घुसले. बिचारी सईकल आजी घाबरूनच गेली. "काय झालं?" घाबऱ्या घाबऱ्या तिने विचारले, "तू अशी धावत पळत का आलीस? तू काही अडचणीत तर सापडली नाहीस ना?"





"नाही, नाही, अडचण बिडचण काही नाही. मी तुमची पिशवी आणली आहे. आजची रात्र मी इथेच राहूं?"

"हो तर. का नाही बाळ? द्वाड मुली किती घाबरवलंस मला? आणि किती दिवसांनी आज येत्येस? ये, बैस शेकोटीसमोर. पार गारठून गेली आहेस तू पोरी!"

"आजीबाई थोडं मांस मटन-बिटन ठेवा शिजायला आणि पोरीला काही चांगलं चुंगलं खाऊ घाला. दुशेन सुद्धा येणारच आहे." कर्तनबाय म्हणाले. ते आपले फेल्टचे जोडे नवीन तळवे लावून दुरुस्त करीत होते. "खरं तर दुशेन केव्हाच परतायला हवा होता. पण काळजी करायचं काही कारण नाही. रात्र व्हायच्या आत तो येईलच. घरी परत येताना आमची म्हातारी घोडी काय पळते!"

हळूहळू रात्रीचा काळोख खिडक्यांमधून घरात शिरू लागला. माझं हृदय पहारा करायला लागलं. बाहेर जरा कुत्री भुंकू लागली किंवा कोणाचा आवाज आला की त्याची धडधड थांबायची. पण दुशेनचा काही अजूनही पत्ता नव्हता. सईकल आजी खूप बोलक्या होत्या म्हणून बरं. वाट पाहणं त्यामुळे थोडं सोप व्हायचं.

आम्ही सगळे असे ताटकळत वाट पाहत बसलो होतो. अर्धी रात्र उलटल्यावर कर्तनबायनी आडवं व्हायचं ठरवलं, "आजीबाई आता अंथरुणं घाला" ते म्हणाले, "आज रात्री तो परतेल असं वाटत नाही. आता फारच उशीर झालाय. हे सरकारी नोकर म्हणजे अगदी बुडलेले असतात कामात. काही निघालं असेल महत्त्वाचं काम नाहीतर तो केव्हाच परत आला असता."

आजोबा पथारीवर आडवे झाले. शेकोटीच्या मागच्या बाजूला कोपऱ्यांमध्ये माझेही अंधरूण घातले. पण मला झोप काही येईना. कर्तनबाय आजोबा सारखे खोकत होते व ह्या कुशीवरून त्या कुशीवर वळत काहीतरी प्रार्थना पुटपुटत होते.

"माझी म्हातारी घोडी कशी असेल?" ते कळकळीने कुजबुजले. "पैसे नसले तर कोण तुम्हाला चारा देणार तिथे? आणि ओट्स्, त्याचं तर नावच काढू नका. विकत सुद्धा मिळणार नाहीत."

थोड्या वेळाने आजोबा पण झोपले. मी आता वाऱ्यामुळे झोपू शकत नव्हते. वारा छतावजळ घुटमळत होता. छपराखालच्या वळचणीतलं गवत हलवत होता. आपले खरखरीत हात खिडक्यांचा तावदानांवर खराखरा घाशीत होता. भिंतीवर वाऱ्याने बर्फाचा मारा केल्याचा आवाज ऐकू येत होता.

दुशेन अगदी सुखरूप असणार अशी आजोबांची खात्री होती. पण त्यामुळे मला काही दिलासा मिळेना. मी आतुरतेनं त्यांची वाट पाहत होते. त्यांचा विचार सतत डोक्यात घोळत होता. बर्फाळ कुरणांमधून सोसाट्याचा वारा अंगावर घेत खंबीरपणाने येणारी त्यांची एकाकी आकृती डोळ्यापुढे तरळत होती. माझा डोळा लागला असावा, कारण मी एकदम घाबरून जागी झाले. जोराने केकाटल्यासारखा गेंगाणा आवाज तळातून वर हवेमध्ये तरंगतोय असं वाटलं. अरे बापरे! हे तर लांडगे! एकच नाही, कितीतरी! वेगवेगळ्या दिशेने एकमेकांना साद घालीत ते गोळा होत होते. त्या सगळ्यांच्या भुंकण्यामधून एक लांबलक भयानक आरोळी वर उठायची व वाऱ्याबरोबर हळूहळू विरून जायची, दूर जायची. पुन्हा जवळ यायची, असं चालू होतं. कधी कधी तर लांडगे अगदी घराजवळ आल्यासारखे वाटायचे.

"बर्फाच्या वादळामुळे लांडगे ओरडताहेत." आजी पुटपुटल्या. कर्तनबाय काहीच बोलले नाहीत. ते कान देऊन आवाज ऐकत होते.

"हे ओरडणं साधंसुधं नाही. त्यामागे काहीतरी गडबड आहे. लांडगे कोणाचा तरी पाठलाग करीत आहेत. माणूस असेल नाहीतर घोडा. ते कोणाला तरी घेरत आहेत. ऐकलंत? तो दुशेन नसला म्हणजे मिळविलं. हा वेडा तरणाबांड मुलगा कशालाच भीत नाही." घाबऱ्या घाबऱ्या अंधारामधे ते आपला फरकोट चाचपडू लागले. "आजीबाई जरा दिवा लावा. कृपा करून अगदी ताबडतोब!"

आजी आणि मी ताडकन् उठलो, भीतीने लटपटत होतो. दिवा शोधून लावायला आजींना क्षण दोन क्षणच लागले असतील. आणि एकाएकी लांडग्यांचं आरेडणं थांबलं. आवाज एकदम असा बंद झाला की जसा तो कधी झालाच नव्हता.

"घातला घाला त्यांनी सावजावर, मरोत ते!" कर्तनबाय ओरडले.



काही घेऊन ते दाराकडे गेले. अन् त्या क्षणी त्यांचे कुत्रे भुंकायला लागले. कोणीतरी खिडकीच्या बाजूने पळत गेलं, आणि दरवाज्यावर जोराजोराने थाप पडू लागली.

धुक्याचा एक भला मोठा ढगच खोलीत घुसला. तो जरासा विरळ होताच आम्हाला दुशेन दिसले. ते लटपटत आत आले, धापा टाकत, त्यांचा चेहरा काळवंडला होता. भिंतीचा आधार घेत ते धपकन् खाली बसले.

"बंदूक" ते कसेबसे बोलले.

पण आम्ही इतके गोंधळलो होतो की आम्हाला काही समजलेच नाही. माझ्या डोळ्यापुढे तर अंधारीच आली. आणि धुक्यातनं काहीतरी म्हातारा-म्हातारी पुटपुटत आहेत असं ऐकू आलं, "काळ्या मेंढीला बळी द्या, पांढरीचा बळी द्या. पूज्य बॉबूबेदीनची तुझ्यावर कृपा असू दे. समोर तूच आहेस ना?"

"बंदूक...बंदूक द्या मला" दुशेन पुन्हा म्हणाले.

"नाही. आम्ही आता तुला बाहेर जाऊ देणार नाही. आमच्या जिवात जीव असेपर्यंत तरी मुळीच नाही." ते दोघं म्हणाले. "तुला आधी आम्हाला मारावं लागेल!"

माझे तर हातपायच गळून गेले. मी निपचित पडून राहिले होते.

"अगदी दारात पोहचता पोहचता त्यांनी मला गाठलं." दुशेन रागाने ओरडत बोलले आणि आपल्या हातातला चाबूक कोपऱ्यामध्ये फेकून दिला. "घोडी आधीच धापा टाकू लागली होती. त्यात लांडग्यांनी पाठलाग सुरू केला. तरी ती गावापर्यंत आली. आणि मग मात्र कोसळली. आणि तेव्हाच ते तिच्यावर तुटून पडले."

"घोडी गेली तर जाऊ दे. तू तर जिवंत परत आलास ना? तेच काही थोडं नाही. घोडी जर कोसळली नसती तर तूही त्यांच्या तावडीतून सुटला नसतास. आमचा सांभाळ करणाऱ्या बॉबूबेदीनची कृपा म्हणून हा असा शेवट झाला. आता तुझे कपडे बिपडे उतरव अन् शेकोटीजवळ बस. थांब तुझे बूट मीच ओढून काढतो," कर्तनबाय दुशेनच्या अवतीभोवती घोटाळत म्हणाले, "आजीबाई काय असेल अन्न ते ताबडतोब गरम करा."

ते दोघेजण शेकोटीसमोर बसले. "असं पहा. काय व्हायचं ते होणारच."





कर्तनबाय एक सुस्कारा सोडत म्हणाले. ''तू परत यायला एवढा उशीरा का निघालास?''

''मिटींग एवढी लांबेल असं वाटलं नव्हतं. आणि मी पक्षाचा सभासद पण झालोय, काराके!''

''ते छान केलंस. पण उद्या नसतं का निघता आलं? तुला त्यांनी हातात काठी घेऊन हाकलून तर नक्कीच दिलं नसेल. नाही का?''

''नाही हो. पण मी आज परत यायचं मुलांना कबूल केलं होतं. दुशेन म्हणाले. ''ती उद्या सकाळी सगळी शाळेमध्ये येतील ना.''

''काय मूर्ख आहेस.'' कर्तनबाय यांनी रागाने दुशेनकडे पाहिलं. ''ऐका काय बोलतोय शहाणा. आजीबाई, ह्याने त्या कार्ट्यांना कबूल केलं होतं म्हणून स्वतःचा जीव धोक्यात घातला बरं का! काही पटेल का? गाढवा तू जिवंत परतलाच नसतास म्हणजे? काय मूर्खासारखं बडबडतोस तू? मठ्ठ माणसा!''

''ते माझं कर्तव्य आहे. माझं कामच आहे ते कराके. त्या घोडीचं मात्र मला फार मनाला लागलंय. मी नेहमी चालत जातो. तसंच यावेळीही जायला हवं होतं. पण नाही. काय दुर्बुद्धी झाली आणि मी घोडी मागितली ती लांडग्यांना खायला घालण्यासाठी!''

''तू त्याचं मनावर घेऊ नकोस रे. घोडी मेली तर मरू दे. तू जिवंत राहावास म्हणून तिचा बळी द्यावा लागला. बस् संपलं तिथेच.'' आजोबा त्वेषाने म्हणाले. ''आयुष्यभर मी घोड्याशिवाय चालवलं, यापुढेही तसंच चालवेन. तू काळजी नको करू. सोव्हियत सत्ता जर टिकून राहिली तर मी दुसरा घोडासुद्धा घेऊ शकेन.''

''हे मात्र खरंच आहे,'' सईकल आजी डबडबल्या आवाजात म्हणाल्या. ''खरंच आम्ही घेऊ दुसरा घोडा...हे बघ बाळा हे एवढं खाऊन घे छान गरम गरम आहे तोपर्यंत.'' मग सगळेच थोडे गप्प झाले.

''मला तुझं काही समजतच नाही, दुशेन.'' कर्तनबाय् गंभीरपणे म्हणाले. आणि त्यांनी शेकोटीचे निखारे थोडे चाळविले. ''तू काही मूर्ख माणूस तर नक्कीच नाहीस. मी तुला हुशारच म्हणेन. पण तू या मूर्ख पोरट्यांच्यासाठी ती शाळा चालवण्याचा खटाटोप कशासाठी करतोस?

त्यापेक्षा बरं तू काही नाही करू शकत का? अरे तू कोणाच्याकडे, मेंढ्या पाळायसाठी राहिलास तरी असा थंडीत कुडकुडणार नाहीस आणि दोन वेळा पोटभर जेवशील."

"तुम्हाला माझी फार काळजी वाटते हे मला समजतं, कराके. पण ज्यांना तुम्ही ती मूर्ख कार्टी म्हणता त्यांनाही तुमच्यासारखीच शाळेची आणि शिक्षणाची गरजच नाही असं वाटलं तर सोव्हियत देश काही प्रगती करूच शकणार नाही. आपल्या देशाने कणखरपणे उभं राहावं, टिकून राहावं असं तुम्हाला वाटतं की नाही? आणि म्हणून पडतील ते कष्ट करायला मी अजिबात तक्रार करणार नाही, कराके. फक्त मला जास्त चांगलं शिकविता आलं पाहिजे. आणखी काऽही नको. लेनिन काय म्हणाले होते तुम्हाला माहिती आहे ना..."

"एक मिनिट, माझं ऐक," कर्तनबाय मध्येच म्हणाले. एक क्षण थांबून विचार केला आणि पुन्हा बोलले, "तुला एवढं दुःख झालंय. पण डोळ्यातनं आसवं गाळून लेनिनना तू काही परत आणू शकणार नाहीस. नाही का? ते या जगात कोणालाच शक्य नाही. तुझ्यासारखं इतरांना दुःख झालं नाही असं वाटतं का तुला? बघ इथं, माझ्या या बरगड्यांच्या आत माझं हृदय जळतंय आणि त्याचा धूर कडू जहर आहे. आता तुझ्या राजकारणामध्ये याचं काय मोल आहे माहीत नाही पण मी लेनिनसाठी दिवसभरामध्ये पाच-पाच वेळा प्रार्थना करतो. त्याचा धर्म माझ्यापेक्षा अगदी वेगळा आहे तरीसुद्धा. दुशेन मला कधी कधी वाटतं की तू आणि मी इतकं रडायची काही गरज नाही. माझ्या मतीला असं वाटतं की लेनिन आपल्या सर्व लोकांच्या हृदयामध्येच आहेत. प्रत्येक बाप आपल्या मुलाला हा ठेवा देत राहील. ते आमच्या रक्तातच आहेत."

"कराके, तुम्ही हे जे बोललात त्याबद्दल मनापासून धन्यवाद, तुमचं म्हणणं अगदी बरोबर आहे. लेनिन आम्हाला सोडून गेले असले तरी आम्ही त्यांना आमच्या जीवनाचा आदर्श मानू. त्यांच्यासारखेच होण्याचा आटोकाट प्रयत्न करू."

त्यांचं बोलणं ऐकून माझा जीव भांड्यात पडला. भरकटलेलं मन हळूहळू ताळ्यावर आलं. आधी तर मला ते स्वप्नच वाटलं. दुशेन खरोखरच सुखरूप परतले यावर माझा विश्वासच बसेना. उन्हाळ्यामध्ये ओढ्यांना एकाएकी अनावर पूर यावा अशा भावना उचंबळून माझ्या मनाचे बंध तुटले. मी रडू लागले. असा आनंद या आधी कधी कोणाला झाला नसेल असं मला वाटलं. त्या काही मिनिटांच्या अवधीत दुसऱ्या कशाचं अस्तित्वच मला जाणवत नव्हतं. ज्यात मी बसले होते ती मातीची झोपडी, बाहेर घोंघावणारं वादळ, कर्तनबाय यांच्या एकुलत्या एक घोडीला फाडून खात असलेले लांडगे कोणी कोणी अस्तित्वात नव्हते. माझं तन-मन-धन, माझं पूर्ण अस्तित्व एका आगळ्याच, अपार, अमाप दिव्य प्रकाशासारख्या आनंदानं भरून गेलं. मी कांबळं माझ्या डोक्यावर ओढून घेतलं व तोंड हातानं दाबून धरलं, माझे हुंदके कोणी ऐकू नयेत म्हणून. पण दुशेनना ते ऐकू गेलेच!



"शेकोटीच्या मागे हुंदके कोण देतंय?" त्यांनी विचारले.

"ती अल्तिनई आहे. भीऊन गेली होती. म्हणून रडतेय." आजी म्हणाल्या.

"अल्तिनई इथे आहे?" दुशेन ताडकन् उठले आणि माझ्याकडे आले. माझ्या बाजूला वाकून माझ्या खांद्यावर हात ठेवीत म्हणाले, "काय झालं अल्तिनई, रडतेस का तू?"

मी भिंतीकडे वळले व आणखीनच जोराने रडू लागले.

"रडू नको लाडके. कशाने घाबरलीस तू एवढी? तू आता मोठी मुलगी झाली आहेस की नाही? असं रडायचं नाही. इकडे वळ, माझ्याकडे बघ पाहू..." मी त्यांना घट्ट मिठी मारली, माझं गरम अश्रूंनी भिजलेलं तोंड त्यांच्या खांद्यावर ठेवून असहाय्यपणे मुसमुसू लागले. मला आनंदाने ताप आला होता, त्या आनंदापायी अगदी अगतिक झाले होते.

"ह्या वेडीचं मन ताळ्यावर नाहीये असं वाटतंय," कर्तनबाय काळजी करीत म्हणाले आणि आपल्या जाजमावरून उठले, "उठा आजीबाई, काहीतरी मंत्र-तंत्र उच्चारा आणि ताबडतोब करा सगळं."

ते सगळे उगाचच माझ्या अवतीभोवती घोटाळू लागले. सईकल आजी काही मंत्र-तंत्र पुटपुटू लागल्या, माझ्या तोंडावर आलटून पालटून गरम व थंड पाणी शिंपडले आणि आपले अश्रू त्यांनी माझ्या अश्रूमध्ये मिसळून टाकले.

त्यांना हे कळलं असतं तर! माझं मन भरकटलं होतं हे खरं. पण ते अत्यानंदानं. एवढा मोठा आनंद; तो मी शब्दात कसा सांगणार!

माझ्या अंथरूणाच्या बाजूला दुशेन माझं तापाने फणफणलेलं कपाळ थोपटत बसले होते, आपल्या गार-गार हातानं. किती वेळ कोण जाणे. शेवटी मी झोपी गेले.

* * *

हिवाळा आता घाटातून डोंगरापलीकडे निघून गेला होता. वसंत ऋतू आपल्या निळ्या केशकलापासह शिरू लागला होता. सपाट मैदानावरून उबदार वारे डोंगराकडे वाहू लागले; वितळलेल्या बर्फाने ओढे फुगले. ताज्या दुधासारखा जमिनीचा वसंतातील गंध वाऱ्याबरोबर वर जात होता. बर्फाच्या राशी सैल होऊन तुटू लागल्या. झरे किणकिण आवाज करीत एकमेकांत मिसळत नद्यांमध्ये मिसळू लागले. डोंगरावरून धोधो वाहत नद्यांचे धबधबे दिसू लागले, मधे आलेल्या सर्व अडथळ्यांना आपल्या बरोबर खेचू लागले. घळींमधल्या सगळ्या पोकळ्या धुऊन टाकू लागेल आणि सबंध आसमंत आपल्या उत्साही गाण्याने दुमदुमून टाकू लागले.

वयात आल्यावरचा माझा हा पहिलाच वसंत असावा, आतापर्यंतच्या कोणत्याही वसंतापेक्षा तो मला तरी फारच विलोभनीय वाटला. टेकडीच्या माथ्यावरून खाली वसंत ऋतूचं जग पसरलेलं दिसायचं. ते जणू काही आपले हात फैलावून घाईघाईने उतारावरून खाली खाली जात आहे, कुरणामध्ये असं वाटे. त्याला थांबता येतच नव्हते. कारण कुरण एका अद्भुत रूपेरी रेशमाच्या पडद्याखालून सूर्याच्या प्रकाशात चमकत होतं, दूर, अनेक मैल दूर कोठेतरी वितळणाऱ्या तलावांचा निळेपणा दिसायचा. असंच दुरून कुठेतरी घोड्यांचं खिंकाळणं ऐकू येई, बगळ्यांची माळ आकाशात उडताना दिसे. पांढरे ढग आपल्या पंखांबरोबर वाहु नेत. हे आले तरी कुठून? आणि तुम्हाला कुठे बोलावीत आहेत एवढ्या आग्रहानं, हुरहुर लावणाऱ्या आवाजात?

वसंतु ऋतू आला आणि जीवनात मौज-मजा आली. आम्ही नवनवीन खेळ शोधले; आनंदाने हसलो, केवळ जिंवत असल्याच्या आनंदाने; शाळेतून घरी जाताना खूप आरडाओरड करीत पळू लागलो. काकीला माझ्या या



हसण्याखेळण्याचा खूप राग यायचा आणि माझ्यावर रागावण्याची एकही संधी ती सोडायची नाही.

''हे असलं उंडारणं तुला शोभतं का? मूर्ख मुळी. तू आता घोडी झाली आहेस याचं तुला भानच नाही. तुझ्या वयाच्या इतर मुलींची कधीच लग्ने झालीत. त्यांना मुलंबाळं झालीत आणि तू... नुसता वेळ घालव शाळेच्या नावानं. थांब, मीही आता तुझं लग्न नक्की करते.''

खरं तर मी काकींचं बोलणं फारसं मनावर घेतलं नाही. तिच्या शिव्यांची मला सवय झाली होती. मला घोडी म्हणण्याइतकी मी मोठीही नव्हते. त्या वर्षात मी बरीच ऊंच झाले होते. एवढेच.

''तू अजून एक झिप्री पोरगी आहेस'' दुशेन हसत हसत मला म्हणायचे. आणि तुझे केसही लाल चमकदार आहेत. असं मला वाटतं हं.''

मी ते कधी मनावर घेत नसे. ''माझ्या डोक्यावर केसांच्या झिप्र्या आहेत हे खरंय पण माझे केस लाल वगैरे काही नाहीत.'' मी स्वतःशीच म्हणत असे, ''मी थोडी आणखी मोठी झाले म्हणजे काही अशी राहणार नाही. तेव्हा मी नवऱ्या मुलीसारखी दिसेन. माझ्या काकीला सुद्धा मी किती सुंदर दिसू शकते ते समजेल. दुशेन म्हणतात की माझे डोळे ताऱ्यांसारखे चमचम करतात. आणि माझ्या चेहऱ्यावर मोकळेपणा दिसतो.''

एक दिवस शाळेतून घरी परत आल्यावर मला अंगणामध्ये दोन घोडे बांधून ठेवलेले दिसले. त्यांच्यावरील खोगीर व रिकिबी पाहून ते डोंगरामाथ्यावरून आलेले असावेत असे दिसले. डोंगरमाथ्यावरचे लोक कधी कधी माझ्या काका-काकींना भेटायला येत, पिठाच्या गिरणीतून किंवा बाजारातून परतताना.

दारामधूनच मला माझ्या काकीचं वेडपटासारखं हसणं ऐकू आलं. मला फार विचित्र वाटलं.

''माझ्या लाडक्या भाच्या आता खुषीत ये पाहू. एवढ्यानं काही तुझं दिवाळं वाजणार नाही.'' ती म्हणत होती. ''पण जेव्हा हे छोटं कबूतर तुझ्या हातात येईल ना तेव्हा तुला माझे किती आभार मानू असं होऊन जाईल. खी-खी-खी!''

उत्तरादाखल अचकटविचकट हसण्याचे आवाज व पसंती दाखविण्याऱ्या आरोळ्या ऐकू येत होत्या. पण मी घरात शिरताच ते एकदम गप्प झाले. एक

मोठ्या मोठ्या लाल बुंद गालाचा जाडजूड माणूस फेल्टच्या जाजमावर रूमाल अंथरलेल्या टेबलासमोर फतकल मारून बसला होता. आपल्या लाल कातडीच्या हॅटखालून तिरप्या नजरेने त्याने माझ्याकडे पाहिले, घामट कपाळावर हॅट आणखी ओढून घेतली आणि घसा खाकरून नजर खाली वळवली.

"आलीस बाळे, ये! किती गोड बाळी आहे माझी," काकीने प्रेमाचा आव आणीत खोटं, खोटं हसत माझं स्वागत केलं.

जाजमाच्या कडेला माझे काका एका अनोळखी माणसाबरोबर बसले हाते. ते पत्ते खेळत होते. दारू पीत होते व फराळही चालू होता. दोघंही पिऊन धुत्त झाले होते आणि ते जेव्हा पत्ते जमिनीवर जोराने आपटायचे तेव्हा वेडपटासारखे मुंडी हालवायचे.

आमची मांजरी हळूच चोरपावलांनी टेबलक्लॉथवर येऊन बसली. परंतु त्या लालबुंद चेहऱ्याच्या माणसाने तिच्या डोक्यावर असा ठोसा मारला की बिचारी दु:खाने केकाटत लांब कोपऱ्यात जाऊन लपून बसली. बिचारी मनी. किती जोरात मारलं होत तिला. या गडबडीमधून कसं सटकायचं मला कळेना. पण काकीच माझ्या मदतीला आली. "जा बेटा भांड्यामध्ये जेवण आहे. ते थंड व्हायच्या आत दोन घास खाऊन घे," ती म्हणाले.

तिथून सुटका झाली म्हणून मला बरं वाटलं. पण काकीचं हे अचानक बदललेलं विचित्र वागणं पाहून मी सावध झाले.

दोन-एक तासानंतर ते दोघे आपापल्या घोड्यावर स्वार झाले आणि डोंगरमाथ्याकडे निघून गेले. लागलीच काकी नित्यनियमाप्रमाणे माझ्यावर खेकसू लागली. मग माझ्यावरचा ताण जरा सैल झाला. मला मोकळं, हलकं वाटलं, "खूप प्यायली होती ती. म्हणून एवढं प्रेम उतू जात असावं," मी मनाशी ठरवलं.

त्यानंतर काही दिवसांनी सयकल आजी काकीला भेटायला आल्या. मी अंगणामध्ये बाहेर होते. पण आजीचं बोलणं ऐकू येत होतं. ती म्हणत होती, "तुझं डोकं ठिकाणावर आहे का? तिचं आयुष्य बरबाद करते आहेस तू."

त्या दोघींच्यामध्ये कशावरून तरी खूप वादावादी चालली होती. दोघीही



एकदमच ओरडत होत्या. थोड्या वेळाने सयकल आजी बाहेर आली. खूप संतापली होती. माझ्याकडे तिने रागाने पाहिलं. तिला माझी कीव येत होती. माझ्याशी एक शब्द न बोलता तो निघून गेली. तिच्या त्या पाहण्याने मी घाबरून गेले. आजीने इतके रागावण्यासारखं मी केलं तरी काय?

दुसऱ्या दिवशी सकाळी मी जेव्हा शाळेत गेले तेव्हा दुशेनसुद्धा नाराज दिसले. काळीजीने ग्रासलेले दिसले. आपल्या मनाची ही अवस्था आमच्यापासून लपविण्याचा ते प्रयत्न करीत होते. आखणी एक गोष्ट माझ्या लक्षात आली. ते माझ्याकडे पाहायचं टाळत होते. शिकवणं संपल्यावर सगळे दरवाज्यातून बाहेर पडले. दुशेननी मला परत बोलावलं, "जरा थांब, अलूतिनई" माझ्या खांद्यावर हात ठेऊन माझ्याकडे मोठ्या आस्थेने पाहत ते म्हणाले. "घरी जाऊ नको. अलूतिनई, मी असं का म्हणतोय तुला कळतंय ना?"

माझं रक्तच गोठून गेलं. आत्ता माझ्या लक्षात आलं. माझ्या काकीच्या मनात माझं काय वाटोळं करायचं आहे ते.

"तुझ्यातर्फे त्यांना उत्तर मीच देईन." दुशेन म्हणाले. "सध्यापुरती तू आता आमच्याकडे रहा. आणि माझ्यापासून कुठेही लांब जाऊ नकोस."

मी किती घाबरले होते ते माझ्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसलं असावं, दुशेननी नाजुकपणे माझी हनुवटी वर उचलली आणि माझ्या डोळ्यांमध्ये पाहत नेहमीसारखे प्रसन्न हसले, "घाबरू नकोस, अलूतिनई" ते हसत हसत म्हणाले. "मी आहे नं तुझ्या बाजूनं उभा राहायला. तुला भिण्याचं काही कारण नाही. तू नेहमीसारखी वाग. आपले पाठ गिरव, शाळेत ये आणि बाकीचं सर्वकाही विसरून जा. तू किती घाबरली आहेस मला माहीत आहे... मला हे कधीचंच तुला सांगायचं होतं" ते पुन्हा हसले. आणि कशाची तरी मजेशीर आठवण होऊन पुन्हा म्हणाले "त्या पहाटे आपण सगळे झोपेमध्ये होतो तेव्हा कराके कुठे गेले होते तुला माहीत आहे? कोणाला आणायला गेले असतील सांग पाहू. एका मांत्रिक बाईला—जैनाकच्या म्हाताऱ्या बायकोला आणायला. तिला घेऊन जेव्हा ते परत आले तेव्हा मी त्यांना विचारलं. हिला कशासाठी आणलं आहे? आणि ते म्हणाले 'की त्या बाईला थोडा जादूटोणा करू दे. अलूतिनईचं मन भीतीने भरकटलं आहे.' मी त्यांना सांगितलं हिला ताबडतोड घालवून द्या. ती कमीत कमी एक मेंढी तरी



मागेलच. आणि ती द्यायला आपण काही एवढे श्रीमंत नाही. आणि आपण तिला घोडंही देऊ शकत नाही कारण ते तर आपण आधीच लांडग्यांना देऊन टाकलं. तू अजून झोपेतच होतीस. म्हणून मी तिला घालवून दिली. त्यानंतर एक सबंध आठवडा कराके माझ्याशी बोललेच नाहीत. त्यांचं म्हणणं होतं की माझ्यामुळे त्यांना खाली पाहावं लागलं. बरं. चल आता, अलूतिनई, आपण घरी जाऊ या."

दुशेनसाठी तरी मी शूर बनण्याचा खूप आव आणला. पण मनातून अगदी भेदरले होते, की माझी काकी येईल आणि मला बळजबरीने घेऊन जाईल. मग ते मला हवं तसं वागवतील. काय वाटेल ते करतील माझं. आणि आख्ख्या गावात त्यांना कोण अडवणार आहे? मी रात्रभर जागीच राहिले, वादळ कधी येऊन आदळतंय याची वाट पाहत.

मला काय वाटतं आहे हे दुशेनना समजत होतं. "तुला आणि मला मिळून एक काम करायचं आहे, अलूतिनई," काहीतरी गूढ असल्यासारखे ते बोलले. "मी तुझ्यासाठी ही पॉप्लरची रोपं आणली आहेत. ती आपण दोघांनी मिळून लावायची. ती जशी वाढतील, मोठी दणकट बनतील तशी तू पण मोठी होशील. एक उत्तम स्त्री बनशील, तुझं हृदय कनवाळू आहे आणि मन जिज्ञासू आहे. तू मोठी अभ्यासू आहेस. मला खात्री आहे आणि लवकरच तुलाही पटेल की मोठेपणी तू विदुषी होणार आहेस, याबद्दल माझी पक्की खात्री आहे. ही रोपं आहेत ना, ही आहेत तुझ्यासारखी छोटी आणि सडपातळ. आपल्या हातांनी आपण ती लावू या, अलूतिनई. सदा सुखी रहा तू माझ्या सुंदर, चमकदार ताऱ्या..."

ती रोपं जवळपास माझ्याच उंचीची होती. सडपातळ, लहान व निळसर पातळ बुंध्याची. आम्ही रोपं लावली. तेवढ्यात डोंगरावरून वाऱ्याची झुळूक आली, आणि त्या इवल्याशा पानांना चाटून गेली. पहिल्यांदाच तिने त्यांच्यामध्ये प्राण फुंकला. पानं थरारली आणि पॉप्लरची रोपं डुलली...

"बघ किती छान आहे!" दुशेन खुशीत आले होते. जरा बाजूस सरून म्हणाले, "आता तो छोटा झरा वाहतो आहे तिथून आपण एक छोटासा पाट काढू या. मग ह्या रोपांचे भव्य वृक्ष होतील. पहाच तू! या टेकडीवर दोन भावांसारखे ते एकमेकाच्या शेजारी उभे राहतील. आणि भल्या माणसांना ते

नेहमी दिसतील आणि आनंद देतील. तेव्हा जीवनही बदललेलं असेल अल्तिनई. यापुढेच आपलं उज्वल भविष्य आहे...''

दुशेनच्या या चांगुलपणाने मी किती हरखून गेले होते ते आजही मला शब्दात सांगता येत नाही. मी उभी राहून नुसती त्यांच्याकडे पाहत राहिले. मला एक नवीच दृष्टी आली होती. त्या दृष्टीला त्यांच्या चेहऱ्यावरच्या त्या उदात्त सौंदर्यानं, त्यांच्या डोळ्यातील हळुवार चांगुलपणानं भारून टाकलं होतं. मी पाहनच राहिले होते. किती बळकट आणि कुशल असतील त्यांचे हात; त्यांचं निरागस, प्रफुल्लित हसणं मनाला किती ऊब देत असेल याचा मला जणू अंदाजही करता येत नव्हता. आजपर्यंत मी न अनुभवलेली एक विलक्षण भावना माझ्या मनात उचंबळली. मनातल्या मनात त्यांना सांगण्याचा मी आटोकाट प्रयत्न करीत होते, ''गुरुजी, धन्यवाद, तुम्ही जे काही आहात ते मला फार प्रिय आहात... मला तुम्हाला कडकडून मिठी मारावीशी वाटतेय, तुमचं चुंबन घ्यावंसं वाटतंय!'' पण मला एवढा धीटपणा नव्हता. असले शब्द मोठ्याने बोलण्याची मला शरम वाटली. मी ते सर्व म्हणायला हवं होतं...

चारी बाजूला मैदानामध्ये नुकत्याच उगवलेल्या गवताची हिरवळ होती पर्वतराशींच्या पायथ्याची ही टेकडी गवतामधून वर उंच आली होती. माथ्यावर आम्ही उभे होते. वर स्वच्छ निळं आकाश होतं. आम्ही दोघंही आपापली स्वप्न पाहत होतो. माझ्याभोवती घोंघावत असलेल्या संकटाचा त्यात मागमूसही नव्हता. उद्याचा मी विचारच करत नव्हते. दोन दिवस मी घरी गेले नव्हते तरी काकी शोधायला आली नाही याचं आश्चर्यही मला तेव्हा वाटत नव्हतं. त्यांनी मला पूर्ण विसरून जावं आणि माझा नाद सोडून द्यावा अशी आशा मला वाटत होती. पण दुशेनना मात्र ह्या विचारांनी त्रस्त करून सोडले होते.

''काळजी करू नकोस अल्तिनई, आपण यातून काहीतरी मार्ग काढू'' वस्तीकडे परतताना दुशेन म्हणाले. मी परवा पुन्हा केंद्रामध्ये जाणार आहे. तिथे मी तुझ्याबद्दल बोलेन. त्यांना सांगून पाहीन शहरातल्या शाळेत तुला पाठवायला. तुला आवडेल ना जायला?''

''गुरुजी तुम्ही जे सांगाल ते सगळं मी करीन.''



शहर म्हणजे काय असतं याची पुसटशी कल्पनासुद्धा मला नव्हती. तरी सुद्धा दुशेन मला तिथे पाठवणार या कल्पनेने मी शहरी जीवनाची स्वप्नं पाहू लागले. माझ्या डोक्यात आता दुसऱ्या कशाचाच विचार नव्हता. एकदा हे सर्वच अगदी अनोळखी आणि भीतिदायक वाटे तर दुसऱ्या क्षणी मी तिथे जाण्यास उतावीळ होई.

दुसऱ्या दिवशी शाळेमध्ये पाठ चालू असतानाही मी दिवास्वप्नच पाहत होते; शहरामध्ये मी कोणाच्या घरी राहीन, तिथलं जीवन कसं असेल? मला कोणी आपल्या घरी आसरा दिला तर ते जे जे सांगतील ते सर्व मी करेन—लाकडं फोडेन, पाणी आणेन, कपडे धुवीन, सारं काही. एवढ्यात बाहेर एकाएकी घोड्यांच्या टापा ऐकू आल्या आणि मी दचकले. घोडे एवढ्या जलद येत होते की आमची शाळा पायदळी तुडवतील की काय असं वाटलं. आम्ही सगळेच दचकून उठलो आणि धास्तावून पाहू लागलो.

''तुम्ही तुमचे काम चालू ठेवा. तिकडे अजिबात् बघू नका,'' दुशेन पटकन सगळ्यांना म्हणाले.

धाडकन् दार उघडून भिंतीवर आपटलं. उंबऱ्यामध्ये माझी काकी उभी राहिली. तिच्या दुष्ट, तुच्छ चेहऱ्यावर आपण जिंकल्याचाही आविर्भाव होता. दुशेन दारापर्यंत गेले.

''तुम्ही कशा इथे?'' त्यांनी विचारलं.

''त्याच्याशी तुझं काही देणंघेणं नाही. माझ्या मुलीला उजवून टाकण्यासाठी मी इथे आली आहे. चल ये इकडे गचाळ कारटे, ती माझ्यावर धावून आली. पण दुशेन मधे आडवे आले.

''हे पहा इथे सगळी शाळकरी मुलं आहेत. लग्नाच्या वयाचं इथे कोणीही नाही.'' दुशेन जाणूनबुजून शांत राहत म्हणाले.

''ते आम्ही पाहून घेऊ. पाहता काय बाप्यांनो, पकडा त्या कुत्रीला आणि आणा बाहेर खेचून.''

घोडेस्वारांपैकी एकाला तिने खूण केली. तोच तो लाल फॉक्सहॅट घातलेला माणूस. दुसरे दोन घोडेस्वारही खाली उतरले. त्यांच्याकडे जाडजूड लाठ्या होत्या.

दुशेन होते तिथेच ठामपणे उभे राहिले.

"लूत लागलेल्या कुत्र्या, तुला घर ना दार. तू काय समजतोस स्वतःला? आमच्या पोरीबाळींवर तू हुकूम गाजवणार? चल हट, बाजूला हो." तो लठ्ठ गालांचा माणूस दात विचकत वसकन् दुशेनवर ओरडला, एखाद्या चवताळलेल्या अस्वलासारखा.

"हे पहा, ही शाळा आहे आणि तुम्हाला असं आत घुसण्याचा काही अधिकार नाही," दाराजवळचा खांब घट्ट पकडीत दुशेन म्हणाले.

"मी तुम्हाला सांगितलं नव्हतं? सारा दिवस हा फुकटात त्या कुत्रीशी व्यभिचार करीत बसतो म्हणून." माझी काकी किंचाळली.

"थुंकतो तुझ्या शाळेवर." लालबुंद चेहऱ्याचा माणूस जांभळा होत गरजला. आणि आपला चाबूक त्याने फटकारला.

दुशेन त्यांच्यापेक्षा खूप चपळ होते. त्यांनी लालतोंड्याच्या पोटात एक लाथ हाणली; तसा तो विव्हळत खाली पडला. क्षणभरात दुसरे दोन्ही घोडेस्वार आमच्या गुरुजींवर तुटून पडले. मुलं रडत रडत मला बिलगली. ती माझा झगा घट्ट धरून खेचत होती. आणि मी तशीच त्या धुमश्चक्रीमध्ये घुसले.

"गुरुजींना सोडून द्या. त्यांना मारू नका. मी तुमच्याबरोबर यायला तयार आहे. मला घ्या पण आमच्या गुरुजींना इजा नका करू हो." मी ओरडले.

दुशेन मागे वळले, ते रक्तबंबाळ झाले होते. आणि त्यांचा चेहरा संतापाने भयानक झाला होता. तुटलेल्या दाराचं एक फाळकूट फेकून ते ओरडले, "मुलांनो पळा, पळत जा आपल्या घरी. अल्तिनई पळ काढ इथून." त्यांच्या ह्या ओरडण्याच्या आता किंकाळ्या झाल्या होत्या, त्यांनी दुशेनचा हात तोडला होता. मोडका हात दुसऱ्या हाताने सावरीत दुशेन मागे सरकले. ती दोन माणसं बिथरलेल्या बैलांसारखी डरकाळ्या फोडीत हतबल झालेल्या गुरुजींवर धावून गेली.

'मारा त्याला! मारा त्याला! हाणा त्याच्या बोडख्यात! मारून टाका."

काकीने आणि त्या लालतोंड्या जंगली माणसाने मला पकडले, माझी लांबसडक वेणी माझ्या गळ्याभोवती गुंडाळून त्यांनी मला खेचत बाहेर आणलं. माझ्यातील सर्व बळ एकवटून मी त्यांच्या तावडीतून सुटण्याचा



प्रयत्न केला आणि त्या क्षणीच माझ्या शाळेतली मुलं भीतीने एकमेकांना बिलगून बसलेली दिसली, ओरडण्यासाठी तोंडं उघडलेली; आणि दुशेन भिंतीशी कोलमडून पडलेले. भिंत त्यांच्या रक्ताने माखलेली होती.

"गुरुजी!" मी ओरडले.

परंतु दुशेन माझ्या मदतीला येऊ शकले नाहीत, ते उभेसुद्धा राहू शकत नव्हते, त्यांचे हेलपाटे जात होते. अजूनही ती माणसं मारतच होती. लटपटणारं आपलं डोकं वर करायचा गुरुजींनी प्रयत्न केला. पण त्या नराधमांनी त्यांना पुन्हा पुन्हा मारलं. मला जमिनीवर आडवं पाडून त्यांनी माझे हात बांधले. आता दुशेन पार कोसळले.

"गुरुजी" मी पुन्हा ओरडले. माझं मुस्कट बांधून त्यांनी मला खोगीरावर आडवं फेकलं. लालतोंड्या आधीच स्वार झालेला होता. आपल्या शरीरानं व हातांनी त्याने मला चेपून ठेवलं. दुसरे दोघेजण स्वार झाली तरी माझ्या बाजूबाजूने पळत होती. मला शिव्या देत माझ्या डोक्यावर थपडा मारीत होती.

"तूच आपल्यावर हे सारं ओढवून घेतलं आहेस. टळली एकदाची बला तुझी. आणि तो तुझा किंमती मास्तर, त्याचीही."

पण गुरुजींचा अंत झालेला नव्हता. "अल्तिनई" मला त्यांची आर्त अगतिक हाक ऐकू आली.

डोकं खाली घालून मोठ्या मुष्किलीनं मी मागे वळून पाहिलं. दुशेन आमच्या मागे पळत येत होते. मारून मारून लोळागोळा झालेले, रक्ताने पूर्ण माखलेले असे पळत होते. हातात एक मोठा दगड होता. त्यांच्यामागे सगळी मुले होती, रडत, ओरडत, मुसमुसत येत होती.

"थांबा लांडग्यांनो थांबा, सोडा तिला. अल्तिनई!" दुशेन ओरडले.

घोडेस्वार थांबले. दुशेनशी मारामारी केलेले दोघे मागे फिरले. आपल्या तुटलेल्या हाताची बाही दाताने धरून दुशेनने नेम धरून दुसऱ्या हातातला दगड त्यांच्यावर फेकला. पण त्यांचा नेम चुकला. त्या दोघांनी आपल्या काठ्यांनी दुशेनला मारलं. आणि दुशेन कोसळले. मी बेहोष होण्याअगोदरच्या क्षणार्धात वळून पाहिलं. मुलं आपल्या गुरुजींच्या कोसळलेल्या देहाकडे पळत होती आणि तिथे पोहचताच भिऊन स्तब्ध झाली होती.





त्यांनी मला कुठे आणि कसे नेले हे त्यानंतर मला काहीच कळले नाही. मी शुद्धीवर आले तेव्हा एका विचित्र यूर्टमध्ये (Yurt) होते. छतामधल्या खुल्या भागातून लवकर उगवणारे तारे शांतपणे, अविचलितपणे लुकलुकत होते. जवळपास नदीच्या वाहण्याचा आवाज येत होता. आणि मेंढपाळांचाही. काळ्या शेकोटीसमोर एक अगदी वाळकी कठोर दिसणारी बाई बसली होती. मातीसारखा काळा काळा चेहरा होता तिचा. मी वळून पाहिलं...हो तोच. नुसत्या नजरेने त्याचा वध करता यावा अशी मला जबर इच्छा होती.

''ए काळुंद्रे, उठव तिला.'' तो लालतोंड्या पशू म्हणाला.

ती काळी बाई माझ्याजवळ आली आणि माझे खांदे तिथे बेफिकीरीने गदागदा हलवले. ''तिला समजाव. आणि समजली नाही तर जाऊ दे. मी तिच्याशी फुकट बोलत बसणार नाही.'' तो यूर्टमधून निघून गेला. ती काळी बाई जमिनीवर बसली. अजूनही तोंडातून शब्द नाही. ही मुकी आहे की काय? आहे बहुतेक. थंडगार राखेसारखे तिचे डोळे कुठेतरी मख्खपणे रोखलेले होते. कोणताच भाव नाही त्यांच्यामध्ये! काही कुत्रे असे असतात. पिल्लं असतानाच मारून मारून शरण आणलेले. आज्ञा पाळण्याखेरीज आणखी काहीच करू न शकणारे. क्रूर मालकाने सापडेल ती वस्तू त्यांच्या डोक्यात हाणायची अशीच सवय असलेले. त्यांच्या मंद बोथट डोळ्यांमध्ये निराशेची अशी पोकळी जाणवते की त्यांच्याकडे पाहून तुमच्या अंगावर शहारे येतात. त्या काळ्या बाईच्या मेलेल्या डोळ्यांकडे पाहून मलाही मी जिवंतच नाही असं वाटलं. मी मेलेलीच आहे आणि मला जमिनीमध्ये गाडून टाकलं आहे असं वाटलं. मी मेले आहे यावर माझा विश्वास बसला असता. पण नदीच्या खळखळाटाने मी भानावर आले. पाणी झपाट्याने वाहत होतं. सभोवती तुषार उडवीत, फेसाळत, खळखळ आवाज करीत. ते मोकळं होतं, स्वच्छंद होतं. त्याच्यावर कुणाचं बंधन नव्हतं.

दुष्ट काकी, तुझ्या काळ्या आत्म्याचा धिःकार असो. तू माझ्या अश्रू आणि रक्तांत बुडून जावोस. त्या रात्री माझ्यावर बलात्कार झाला, मी अवघी पंधरा वर्षांची होते. हे काळे कृत्य करणाऱ्याच्या मुलींपेक्षाही लहान.

तेथील तिसऱ्या रात्री मी तेथून पळून जायचा निर्धार केला. रस्त्यामधल्या अडथळ्यांना मी सामोरी जाईन, पकडली जाण्याचा धोकाही पत्करेन. पण मी

लढेन अगदी अखेरचा श्वास असेपर्यंत, माझ्या दुशेन गुरुजींसारखी.

यूर्टमधून मी गुपचुप सरपटत मोकळ्या बाजूकडे गेले. अंधारात चाचपडत झडप शोधू लागले. झडप घोड्याच्या केसांच्या दोरखंडाने घट्ट बांधून ठेवलेली होती. अंधारामध्ये त्या गुंतागुतीच्या गाठी सोडवणं अशक्य होतं. मग मी यूर्टची बाजूच थोडी वर उचलून सरपटत बाहेर जाता येईल का हे पाहू लागले. पण त्याचा काही उपयोग नव्हता कारण सर्व बाजू बाहेरून जमिनीत गाडलेल्या खुंट्यांना घट्ट बांधून ठेवल्या होत्या.

आता एकच उपाय राहिला होता. एखादी धारदार वस्तू शोधून झडपेचे दोरखंडच कापून टाकायचे. पुन्हा अंधारात धुंडाळायला सुरुवात केली. आणि त्यातून सापडला तो एक दांडू, निमुळत्या टोकाचा! हताश होऊन मी बाजूच्या पडद्याखालची जमीन उकरायला सुरुवात केली, त्या दांडूनं ह्या खटाटोपामधून काही साधणार नव्हतं. पण त्या वेळेस माझी अक्कल ठिकाणावर असेल तर मला हे समजणार ना! माझ्या डोक्यात एकच एक विचार होता. इथून सुटायचं तरी नाहीतर मरायचं; त्याची ती घरघर आणि घोरणं टाळायसाठी, मरायचंच असेल तर स्वतंत्र होऊन मरण्यासाठी, झुंजत मरण्यासाठी. पण कधीही शरण जायचं नाही.

मी एक रखेल बनवली गेले. या शब्दाची मला इतकी चीड येते! कोणी कुठल्या गलिच्छ काळामध्ये ह्याचा शोध लावला? दुसरी बायको, शरीर आणि आत्म्याने गुलाम बनवलेली. यापेक्षा आणखी लाजिरवाणं काय असू शकतं? बायांनो आता तुमच्या कबरीमधून उठा! बलात्कार केलेल्या, डागाळलेल्या, आपली अस्मिता हरवून बसलेल्या कमनशिबी बायांनो उठा! जाग्या व्हा हुतात्म्यांनो, आणि ह्या जुनाट, गलिच्छ, काळ्याकुट्ट जगाला गदगदा हलवा. मी तुम्हाला साद देत आहे; तुमच्यासारखी (बळी चढवलेली) अखेरची स्त्री. मी, जिला असल्या नशिबाचा फटका बसला पण जिने कडाडून प्रतिकार केला ती मी तुम्हाला साद घालीत आहे.

हे सगळं मी खरोखरच एक दिवस सगळ्यांना खड्या आवाजात सांगेन अशी त्या वेळेस मला कल्पनाही नव्हती. नाईलाजानं वेडीपिशी होऊन मी जोरजोराने जमीन उकरली. जमीन खडकाळ असल्याने उकरली जात नव्हती. माझ्या तुटक्या रक्तंबबाळ नखांनी मी खरवडत होते. माझा हात खालून



बाहेर काढता येईल एवढे भोक होईपर्यंत दिवस उजाडला. कुत्री भुंकू लागली, लोक जागे झाले. घोड्यांचा एक कळप टापांचा जोरजोरात आवाज करीत बाजूने गेला. त्यापाठोपाठ झोपाळू मेंढ्यांचा कळप गुरगुरत गेला. त्यानंतर कोणीतरी यूर्टच्या बाहेरचे दोरखंड सोडायला सुरुवात केली. आणि त्यानंतर बुरणुसं काढायला लागले. मुकी काळी बाई हे करीत होती.

म्हणजे हे लोक आता इथून दुसरीकडे जाण्याच्या तयारीत आहेत. आपल्या दिवशी कोणीतरी एकमेकांशी बोलत असताना मी ऐकलं होतं; त्याची मला एकदम आठवण झाली : ते आज सकाळी इथून निघणार, सुरुवातीस खिंडीजवळ जाणार, नंतर पवर्तांच्या मधे खिंडीच्या पलीकडे. सारा उन्हाळा तिथेच घालविणार. माझा छळ संपण्याची आशा आणखीनच दुरावली. तेथून सुटका करून घेणं शंभर पटीनं कठीण होईल.

मी खणून ठेवलेल्या भोकापासून दूर जाण्याचा प्रयत्नही केला नाही. उपयोग तरी कुठे होता त्याचा, काळ्या बाईनं भोक व त्याशेजारचा मातीचा ढीग पाहिला होता. पण ती काहीच बोलली नाही. मुकाट्यानं तिचं तिचं काम करीत राहिली. तिच्या सगळ्याच वागण्यामध्ये एक तिऱ्हाईतपणा होता, आजूबाजूच्या जगामध्ये काय वाट्टेल ते होवो, कशालाच कुठलाच प्रतिसाद मिळणार नाही तिच्याकडून. तिने नवऱ्यालाही उठवले नाही. सामान बांधायला मदत कर म्हणायची तर हिंमतच नव्हती. गाड्यांचं गिअर आवाज करतं तसा तो घोरत पडला होता घोंगड्यांच्या आणि फरकोटाच्या डोंगराखाली.

सगळी बुरणुसं गुंडाळून झाली. यूर्ट उघडा पडला होता. एखाद्या पिंजऱ्यात बसवल्यासारखी मी तिथे बसलेली होते, घोड्यांवर व बैलांवर सामान लादणाऱ्या नदीपलिकडच्या लोकांकडे पाहत. एवढ्यात तीन घोडेस्वार तिथे आले. तिथल्या लोकांशी काही बोलून ते आमच्या यूर्टकडे वळले. आधी मला वाटलं की तिथून निघण्यासाठी ते सगळ्यांना एकत्र गोळा करीत आहेत. मी जरा जास्त निरखून पाहिलं आणि माझा श्वासोच्छवास क्षणभर रोखला. त्यांच्यामधला एक दुशेन होता. दुसऱ्या दोघांच्या डोक्यावर सैनिकांच्या टोप्या होत्या. त्यांच्या कोटांच्या खांद्यावर लाल पट्ट्या होत्या. मला धक्काच बसला. तोंडातून आवाज फुटेना. माझे गुरुजी जिवंत आहेत ही किती





आनंदाची गोष्ट. पण माझ्या मनामध्ये अंधारी पोकळी पसरली होती : मी संपले आहे, डागाळली गेली आहे.

दुशेनच्या डोक्यावर पट्टी बांधलेली होती. हात झोळीमध्ये अडकविलेला होता. त्यांनी घोड्यावरून पटकन उडी मारली ते यूर्टमधे घुसले आणि त्यांनी घोरत पडलेल्या त्या लालतोंड्या श्वापदाच्या अंगावरच्या घोंगड्या खसकन दूर केल्या.

''चल ऊठ'' ते ओरडले.

त्या माणसाने डोके थोडे वर उचलले, डोळे चोळले आणि दुशेनवर झेप घेतली. पण तो ताबडतोब मागे सरला; दोन सैनिक त्याच डोक्यावर रिव्हॉल्व्हर रोखून उभे होते. दुशेनने त्याची मानगूट पकडली त्याला गदागदा हालवला आणि खसकन ओढून त्याचा चेहरा आपल्यासमोर आणला.

''गटरीतल्या डुकरा'' आपल्या फिकट पडलेल्या ओठामधून ते सापासारखे फुत्कारले, ''तू जिथे असायला पाहिजेस त्या जागी आता जाशील बघ! चल ऊठ.''

मुकाट्याने तो पुढे निघाला पण दुशेनने त्याच्या जाडजूड खांद्यत आपली बोटं खुपसून त्याला वळवला आणि त्याच्याकडे रागाने पाहत, कापऱ्या आवाजात म्हणाले :

''तू काय समजतोस ही मुलगी काय एक गवताच पातं आहे काय? तुझ्यासारख्यानं तुडवायला? तू काय समजतोस तूं तिला उद्‌ध्वस्त केलीस? बिलकुल नाही. त्याची सुतराम शक्यता नाही. आता तुझे दिवस संपलेत आणि हिचा दिवस आता उजाडला आहे. त्यातून तुझा नाश अटळ आहे.

लालतोंड्या माणसाला त्यांनी आपले बूट घालू दिले व नंतर त्याचे हात बांधून त्याला घोड्यावर आडवा घातला. सैनिकांपैकी एकाने घोड्याचा लगाम धरला त्याला न्यायला सुरुवात केली. दुसरा सैनिक घोड्यावरून त्याच्या मागे जाऊ लागला. मी दुशेनच्या घोड्यावर बसले आणि दुशेन माझ्या घोड्याच्या बाजूने चालू लागले.

आम्ही चालू चागलो आणि मागून एक रानटी आरोळी उठली. ती माणसाची नसावी अशी कर्कश. ती काळी बाई आमच्या मागे पळत येत होती आणि किंचाळत होती. ती आपल्या नवऱ्याच्या अंगावर धावून गेली

आणि त्याची हॅट तिने खाली पाडली; एक दगड त्याच्या डोक्यात हाणून!

दुष्ट सापा! माझं रक्त प्यायला आहेस ना! हे घे त्याच्या बदल्यात. मला ज्या नरकयातना दिल्यास, मी तुला जिवंत सोडणार नाही.'' ती शक्य तेवढ्या मोठ्या आवाजात ओरडत होती.

लग्नानंतरच्या इतक्या वर्षांमध्ये बहुधा त्या बिचारीला आपलं डोकंही वर उचलता आलं नसावं. आणि आता इतकी वर्षे साचलेला सारा कडवटपणा, कोंडून ठेवलेला सारा संताप उफाळून आला. दगडाच्या घळींमधून तिच्या किंकाळण्याचे पडसाद उमटत होते. ती आपल्या नवऱ्यावर पुन्हा पुन्हा धावून जात होती. खोगीरात आडवा पडलेला तो भीतीने अंग चोरत होता. ती त्याच्यावर शेण, दगड, चिखल मिळेल ते फेकीत होती आणि शिव्यांची लाखोली वाहत होती.

''तू जिथे जिथे पाऊल ठेवशील तिथे जमीन उजाड होवो, गवतही न उगवो. तुझं मढं उघड्यावर पडो आणि कावळे तुझे डोळे उकरून काढोत. पुन्हा मला तुझं तोंड दाखवू नकोस. चालता हो दुष्टा. जा जा.''

तिने थांबून थोडा श्वास घेतला आणि मग ओरडत, भेकत तिथून पळाली. तिचे केस डोक्याच्या मागे वाऱ्याने उडत होते.

तो एक भयानक अनुभव होता. माझं डोकं गरगरत होतं. मी पार खचून गेले होते. दीनवाणी झाले होते. दुशेन लगाम हातात घेऊन माझा घोडा नेत होते. मुकाट्याने चालत होते, पट्टी बांधलेलं डोकं खाली झुकवून.

शेवटी एकदाची ती दुर्दैवाचा घाला घालणारी खिंड आम्ही ओलांडून मागे टाकली, सैनिक खूप पुढे निघून गेले होते. दुशेनने घोडा थांबविला आणि प्रथमच माझ्याकडे पाहिले. त्यांच्या डोळ्यांमध्ये यातना दिसत होत्या.

''मी दोषी आहे. मी तुझं रक्षण करू शकलो नाही, अल्तिनई. मला माफ कर,'' ते म्हणाले. माझा हात त्यांनी आपल्या हातात घेतला आणि स्वतःच्या गालावर दाबला. ''तू जरी मला माफ केलेस तरी मी स्वतःला कधी माफ करू शकणार नाही.''

मी माझ्या घोड्याची मान पकडून धुमसून रडू लागले. दुशेन माझ्याजवळ उभे राहिले. मुकाट्याने माझ्या केसांवरून हात फिरवत त्यांनी मला रडू दिलं.

''चल, अल्तिनई. आता आपण निघू या'' ते म्हणाले. ''मला तुला



काही सांगायचं आहे. मी परवा स्थानिक केंद्रामध्ये गेलो होतो. तू आता शहरात जाणार आहेस. शाळेमध्ये जाणार आहेस.''

आम्ही एका खळखळणाऱ्या स्वच्छ पाण्याच्या ओढ्याजवळ आलो. तिथे दुशेन थांबले. ''तुझा चेहरा जरा धुऊन घे, अल्तिनई,'' ते खिशातून साबणाची वडी काढीत म्हणाले. ''हे घे. हा साबू वापर. तुला हवं असेल तर मी घोड्याला चरायला कुरणात घेऊन जातो म्हणजे तुला नदीमध्ये आंघोळ करता येईल. आतापर्यंत जे काय झालं ते विसरून जा. पुन्हा त्याची आठवण करायचीच नाही. थोडं पोहून घे, अल्तिनई. त्याने तुला थोडं बरं वाटेल. ठीक आहे?''

मी मान हलवून हो म्हटलं, आणि दुशेन थोडे लांब गेल्यावर मी आपले कपडे काढले आणि हलकेच सांभाळून पाण्यामध्ये शिरले. तळामधले पांढरे, निळे, हिरवे व तांबडे गोटे खालून माझ्याकडे पाहत होते. निळं पाणी माझ्या घोट्यांभोवती गरगरत होतं. खळखळ आवाज करत होतं. मी ओंजळीत थोडं पाणी घेऊन आपल्या छातीवर टाकलं. ते माझ्या शरीरावरून ओघळत खाली गेलं आणि मला गुदगुल्या झाल्या. गेल्या तीन दिवसांमध्ये मी पहिल्यांदाच हसले. हसताना मला केवढा आनंद वाटला. अंगावर पुन्हा पुन्हा पाणी उडवून मग मी खोल पाण्यात शिरले. पाण्याच्या प्रवाहाने मला लगेच पुन्हा उथळ जागी फेकले. मी उभी राहिले आणि पुन्हा एकदा त्या फेसाळ प्रवाहात उडी घेतली.

''हे नदी माते, मागच्या तीन दिवसामधलं सारं गलिच्छ आणि अमंगळ धुवून काढ. पाण्या तुझ्याइतकं मला स्वच्छ, निर्मळ कर,'' मी पुटपुटले.

ज्या ज्या जागांमध्ये आपल्या बहुमोल आठवणी साचलेल्या असतात त्या त्या जागी आपल्या पायाचे ठसे आपल्याला का उमटवता येत नाहीत? ज्या वाटेने मी आणि दुशेन त्या डोंगरांमधून खाली उतरलो ती जर मला पुन्हा सापडली तर मी त्या वाटेवर सपशेल आडवी पडून माझ्या गुरुजींच्या पावलांच्या ठशांचं चुंबन घेईन! जगातल्या साऱ्या रस्त्यांपेक्षा मी ज्यांच्यावरून चालले त्या साऱ्या रस्त्यांपेक्षा जास्त या पाऊलवाटेचं अप्रूप आहे मला. तो पुण्यवान दिवस, ती वाट, त्या रस्त्याने मी पुन्हा जीवनाकडे वळले, नव्या आशेने प्रकाशाकडे...त्या दिवसाच्या सूर्याला, पृथ्वीला माझे धन्यवाद...

दोन दिवसांनंतर दुशेननं मला रेल्वे स्टेशनावर नेलं. माझ्यावर जे काही गुदरलं होतं त्यानंतर खेड्यात थोडा वेळही मला राहायचं नव्हतं. माझं नवीन जीवन एका नवीन जागीच सुरू व्हायला हवं होतं. सयकल व कनर्तबाय यांनी माझ्या प्रवासाची तयारी केली. ते माझ्या अवतीभोवती नाचत होते. फराळाची पाकीटं माझ्यावर लादत होते. आणि लहान मुलांसारखे रडत होते. खूपसे शेजारी मला निरोप द्यायला आले. त्यांच्यामध्ये भांडकुदळ सतिमकुल सुद्धा होते. सगळ्यांनाच माझा ताबडतोब गाव सोडून जाण्याचा निर्णय पसंत होता.

''देव तुझं भलं करो, मुली,'' सतियमकुल मला म्हणाले, ''तुझा मार्ग साफ राहो. मुळीच भिऊ नकोस. गुरुजींनी तुला शिकवले आहे तशीच जग, मग तुझं भलंच होईल. कोणी काहीही म्हणो पण आता आम्हालाही काही गोष्टी चांगल्या ध्यानात येऊ लागल्या आहेत.''

शाळेतील मुलं आमच्या गाडीमागे किती वेळ पळत होती आणि हात हलवून निरोप देत होती...

माझ्या बरोबर आणखी अनेक मुलं ताष्कंदला बालगृहात जाण्यासाठी निघाली होती. रेल्वे स्टेशनवर चामड्याचे जाकीट घातलेल्या एक रशियन बाई आमची वाट पाहत होत्या.

त्यानंतर पुढच्या आयुष्यामध्ये मी कितीतरी वेळा त्या डोंगरांमधल्या, पॉप्लर झाडांनी वेढलेल्या त्या स्टेशनावरून येत जात असेन. माझ्या हृदयाचा अर्धा हिस्सा मला वाटतं मी तिथे कायमचा ठेवून दिलाय.

वसंत ऋतूमधील फिकट जांभळ्या रंगाच्या त्या संधिप्रकाशात काही तरी दुःखद, काहीतरी हृदय पिळवटून टाकणारं जाणवत होतं. ती संध्याकाळ जणू जाणत होती की आमचं हे एकमेकांना निरोप देणं शेवटचं अखेरचं आहे. आपलं मन किती जड झालं आहे, आपल्याला किती दुःख होत आहे हे लपविण्याचा दुशेनने आटोकाट प्रयत्न केला. पण मी ते ताडलं होतं. कारण माझ्याही गळ्यामध्ये असाच दुःखाचा आवंढा अडकला होता. ते माझ्या डोळ्यांत निरखून पाहत होते आणि हातांनी माझे केस, चेहरा, माझ्या कोटाची बटनेसुद्धा कुरवाळीत होते.

''मला शक्य झालं असतं तर मी तुला माझ्यापासून कधीच दूर जाऊ दिलं नसतं, अल्तिनई. पण तुझ्या मार्गामध्ये आड येण्याचा मला काही अधिकार नाही. तुला शिकायलाच हवं. आणि तुला माहीत आहे की मी स्वतः फार शिकलेला नाही. तुला जायलाच हवं. त्यातच सर्वांचं भलं आहे...कुणी सांगावं, एक दिवस तू खरोखरीची शिक्षिका बनशील. तेव्हा तुला आपल्या या शाळेची आठवण येईल. तू कदाचित हसशील. असू दे, असू दे...



दूर गाडीने शिटी वाजविली. घळीमधून तिचा जोरात पडसाद उठला. आणि आम्हाला स्टेशनात येणाऱ्या गाडीचे दिवे दिसले. स्टेशनवर उभ्या असलेल्या लोकांची हालचाल सुरू झाली.

''आणखी एका मिनिटात तू निघून जाशील.'' कापऱ्या आवाजात दुशेन म्हणाले. ''सुखी रहा, अल्तिनई. खूप अभ्यास कर, अगदी खूप. तेच सगळ्यात महत्त्वाचं आहे.'' मला बोलवेना. हुंदक्याने माझा गळा आवळला.

''रडू नको अल्तिनई;'' माझे डोळे पुसत ते म्हणाले. ''ती पॉप्लरची रोपं, तू आणि मी लावलेली, त्यांना मी स्वतः आपल्या हाताने वाढवेन. आणि जेव्हा तू एक थोर, प्रतिष्ठित व्यक्ती होऊन परत येशील तेव्हा पाहशील ती किती छान वाढली आहेत ते,'' एकाएकी आठवल्यासारखे दुशेन म्हणाले.

गाडी स्टेशनात आली. खडखड आवाज करती डबे थांबले.

''आता आपल्याला निरोप घ्यायलाच हवा,'' दुशेनने मला आपल्या बाहूमध्ये घेऊन माझ्या कपाळाचं दीर्घ चुंबन घेतलं. ''यशस्वी हो, लाडके... भिऊ नकोस, नेहमी खंबीर रहा...''

मी डब्याच्या पायरीवर उडी मारली आणि मागे वळून पाहिलं. तो क्षण मी कधीच विसरणार नाही : एक हात झोळीत टांगलेले दुशेन डबडबलेल्या डोळ्यांनी माझ्याकडे पाहत होते, ते खूप पुढे झुकले होते—जणू त्यांना पुन्हा एकदा शेवटचा स्पर्श करायचा होता मला. पण त्या क्षणीच गाडी सुरू झाली.

''ये बरं अल्तिनई, माझ्या चमचमणाऱ्या दिव्या,'' दुशेन सांगता होते.

''येते गुरुजी, येते. आवडते, परमप्रिय गुरुजी येते.''

दुशेन गाडीबरोबर पळू लागले. जरासे मागे राहिले पण लगेच पुढे झेप घेऊन त्यांनी मला आर्त हाक मारली, ''अल्तिनई!''

त्यांच्या हाकेमध्ये मला एक तीव्र निकड जाणवली, जणू काही एकाएकी

त्यांच्या लक्षात आलं, की त्यांना मला काहीतरी कमालीचं महत्त्वाचं सांगायचं होतं ते राहूनच गेलं. पण आता फार उशीर झाला होता. ते त्यांना जाणवत होतं. त्यांची हाक आजही मला ऐकू येते, थेट हृदयामधून, अंतरात्म्यातून बाहेर पडलेली हाक!

गाडी एका बोगद्यामध्ये घुसली आणि बाहेर आली, ती सरळ रस्त्यावर खूप दूरवर जाणाऱ्या, वेग वाढवीत कझाकी मैदानामधून मला माझ्या नव्या जीवनाकडे नेत होती ती, खूप झपाट्याने!

मी गुरुजींचा निरोप घेतला. माझ्या पहिल्यावहिल्या शाळेचा, माझ्या बालपणाचा आणि माझ्या पहिल्यावहिल्या प्रेमाचाही!

ज्याचं दुशेन स्वप्न पाहत होते अशा मोठ्या शहरात मी राहू लागले. एका मोठ्या शाळेत जाऊ लागले. दुशेन सांगत असत तशा खरोखरच मोठ्या मोठ्या खिडक्या या शाळेच्या इमारतीला होत्या. शाळेचं शिक्षण संपवून मॉस्कोला एका मोठ्या शैक्षणिक संस्थेमध्ये मी प्रवेश घेतला.

अभ्यासाच्या त्या लांबलचक वर्षांमध्ये मला खूप अडचणींना तोंड द्यावं लागलं. मला केव्हा केव्हा निराशा वाटायची. असं वाटायचं की एवढं सगळं ज्ञान मला मिळवता येणं अशक्य आहे. पण मी प्रयत्न सोडले नाहीत. तशी हिंमतच होणार नव्हती. कारण माझ्या आद्यगुरुंचं ऋण होत माझ्यावर! फारच बिकट परिस्थिती झाली की मला त्यांची आठवण व्हायची. आणि माझी हिंमत वाढायची. इतर मुले जे सहजपणे शिकून जायची ते शिकायला मला खूप मेहनत करावी लागायची. कारण माझा पाया घातलेलाच नव्हता. मला सर्व मूळापासून शिकावे लागले.

हायस्कूलमध्ये असताना मी दुशेनना एक पत्र लिहिलं. त्या मी लिहिलं होतं माझं त्यांच्यावर प्रेम आहे आणि मी त्यांची आतुरतेनं वाट पाहत आहे. त्यांनी उत्तर दिलंच नाही. आणि मी त्यानंतर पुन्हा कधी लिहिलंही नाही. मला वाटतं त्यांनी स्वतःच्या आणि माझ्याही सुखाला तिलांजली दिली. केवळ मी आपला अभ्यास करणं सोडू नये म्हणून. एका दृष्टीने तेच योग्य होते... का त्याचं दुसरंच काही कारण होतं? ही शंका, ही पीडा त्या दिवसांमध्ये माझा पिच्छा पुरवीत होती.

मॉस्कोमध्ये मला माझी पहिली पदवी मिळाली, तिथे मी एक प्रबंध



सादर केला होता. माझ्या दृष्टीने हा माझा मोठा विजयच होता. त्या अतिशय व्यस्त दिवसांमध्ये मला एकदाही घरी जाता आलं नाही. आणि नंतर लढाई सुरू झाली. त्या वर्षीच्या शरदामध्ये मी फ्रुंझला जात होते. ज्या स्टेशनवर दुशेन व मी एकमेकांपासून दूर झालो त्या या छोट्याशा स्टेशनावर मी गाडीतून खाली उतरले. माझं नशीब चांगलं होतं. एक बग्गी माझ्या गावी जात होती.

माझं प्रिय गाव ज्याला मी युद्धाच्या सावटाखाली भेटायला जात होते. या खूप बदललेल्या प्रदेशाकडे पाहताना मला आनंद वाटत होता. नवी खेडी दिसत होती. जागोजागी शेतीची पिकं दिसत होती. नवीन रस्ते, नवीन पूल. पण युद्धाच्या सावटाने या सगळ्या आनंदावर विरजण पडलं होतं.

गावाच्या जवळ आल्यावर उत्सुकतेनं माझं अंग शहारलं, दुरूनच मी नवीन रस्ते, घर, फळबागा ओळखायचा प्रयत्न केला. मग मी माझी दृष्टी त्या टेकडीकडे वळवली; एकेकाळी जिथे आमची शाळा उभी होती. बाजूलाच दोन पॉप्लरची उंच झाडं होती, एकमेकाशेजारी उभी! ती दिसताच माझा श्वास रोखला. ती वाऱ्यावर हळूवारपणे डुलत होती. आणि त्या क्षणी मी पहिल्यांदाच त्यांच्या नावाने हाक मारली. त्यांना मी नेहमीच गुरुजी म्हणत असे.

''दुशेन'' मी पुटपुटले. ''माझ्यासाठी तुम्ही काय काय केलंत, दुशेन. त्या सर्व गोष्टींसाठी धन्यवाद. माझ्याबद्दल तुम्ही विचार करीत होतात तर...मला दिलेलं वचन तुम्ही तंतोतंत पाळलंत...अगदी तुम्हाला—केवळ तुम्हालाच शोभेल असं, दुशेन!''

माझे डोळे भरून आले.

''काय झालं ताई?'' तरुण गाडीवानाने आस्थेनं विचारलं.

''तसं काही खास नाही. तू इथे कोणाला ओळखतोस का?''

''हो हो मी इथल्या प्रत्येकाला ओळखतो.''

''तू दुशेनना ओळखतोस? ते इथे शाळेत शिकवायचे.''

''दुशेन? ते तर सैन्यात भरती झालेत. याच बग्गीमधून मी स्वतःच त्यांना सैनिक भरतीच्या दप्तरामध्ये सोडून आलो.''

मी त्याला मला तिथेच सोडायला सांगितलं. दुसरं करणार तरी काय?



घरोघर जाऊन विचारणार मला ओळखता का असं? छे आता या अशा वेळी तरी मी तसे करू शकत नाही. आणि दुशेन तर निघून गेले आहेत लढाईवर. आणि दुसरी गोष्ट ही की मी माझ्या काका-काकीच्या घरात पुन्हा पाऊलसुद्धा न ठेवण्याचा निर्धार केला आहे. माणूस अनेक गुन्हे माफ करू शकतो. पण काका-काकींनी केलेल्या अधम गुन्ह्याला कोणीही माफ करणार नाही. मी इथे आले होते हेही त्यांना कळू देण्यास मी तयार नाही. म्हणून मी रस्त्यावरून टेकडीकडे वळले आणि वर चढून गेले पॉप्लर वृक्षांच्याकडे.

माझी पॉप्लरची झाडं. माझ्या सुंदर पॉप्लरांनो तुम्हाला इथे अगदी लहान रोपं असताना रूजवलं त्यानंतर पुलाखालून कितीतरी पाणी वाहून गेलं आहे. ज्या माणसानं तुम्हाला इथे रोवलं, तुम्हाला खतपाणी घातलं, तुमची इतकी काळजी घेतली त्याने पाहिलेली सगळी स्वप्नं, त्याने केलेली सगळी भाकितं आज खरी ठरली आहेत. मग तुम्ही इतक्या दुःखाचे, खिन्नपणाचे गाणे का गुणगुणता आहात. तुम्हाला उन्हाळा संपून गेल्याचं दुःख आहे का? थंड वारं तुमची पानं ओरबाडत आहेत म्हणून दुःखी आहात. आमच्या लोकांना सहन कराव्या लागत असलेल्या यातना आणि दुःखाने तर तुमचे बुंधे कुरकुरत नाहीत ना?

अर्थात हिवाळा येणार, कडाक्याची थंडी पडणार, हिमवादळं होणार हे सगळं खरं आहे. पण त्यानंतर पुन्हा वसंतही येणार आहेच की...

मी तिथे खूप वेळ थांबले होते, पिवळ्या पडू लागलेल्या पानांची सळसळ ऐकत. झाडांच्याभोवती खोदलेली पन्हळ नुकतीच स्वच्छ केली असावी कारण जमिनीवरचे कुदळीचे खोल घाव अगदी ताजे असल्याचे जाणवत होते. पन्हळ स्वच्छ पाण्याने पूर्ण भरली होती. पाण्यावर नाजूक तरंग उठत होते आणि पॉप्लरची गळलेली पिवळी पानेही.

मी जिथे उभी होते तिथून मला शाळेच्या नव्या इमारतीचे छप्पर ओळखू येत होते. आमच्या जुन्या शाळेचा मात्र टेकडीवर मागमूसही उरला नव्हता...

मी रस्त्याकडे आले आणि मला रेल्वे स्टेशनवर जायला पहिल्याच बग्गीमध्ये जागा मिळाली.

लढाई झाली आणि आणि त्यानंतर आमचा विजय झाला. आपापल्या वडिलांच्या नकाशे ठेवायच्या पिशव्या मुलं दिमाखात पुस्तकं शाळेत नेण्यासाठी

वापरू लागली. युद्धकाळात पुरुषांची सारी कामे बायकाच करीत. त्यातून युद्धावरून परत आलेल्या पुरुषांनी त्यांची सुटका केली. हौतात्म्य पत्करलेल्या सैनिकांच्या विधवा—डोळ्यातील पाणी आटून गेलेल्या—आपला एकाकीपणा स्वीकारून जगू लागल्या. काही जणी अजूनही आपले प्रियकर परत येतील अशी आशा लावून बसल्या होत्या.

मलाही दुशेनची काहीच बातमी मिळाली नव्हती. कुर्कुरूहून शहरात येणारे लोक सांगायचे की त्यांचे नाव बेपत्ता सैनिकांच्या यादीमध्ये आले आहे, अशी सरकारी खबर गावाकडे आली होती म्हणे!

''मारला गेला असेल बिचारा!'' ते म्हणायचे. ''किती दिवस लोटले पण त्याची काही खबरबातच नाही.''

म्हणजे गुरुजी आता परत येणार नाहीत! आठवणींमध्ये घट्ट बसलेला, एकमेकांचा निरोप घेतानाचा तो दिवस म्हणजे आमची अखेरचीच भेट ठरली...

किती दुःख आणि क्लेश माझ्या मनात दडलेले आहेत, गतकाळाची ही पाने उलेटपर्यंत ह्याची मला जाणीवच नव्हती.

१९४६ सालचा शरद ऋतू संपता संपता मला एका वैज्ञानिक कामासाठी टॉम्स्क येथील युनिव्हर्सिटीमध्ये जावं लागलं. सैबेरियामधून प्रवास करण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. शरद संपत आल्याचं सावट पसरल्यानं हा सर्वच प्रदेश उग्र आणि भयानक दिसत होता. शेकडो वर्षांची जुनी जंगलं अंधारामध्ये एखाद्या उदास भिंतीसारखी भराभर मागे जाताना दिसत होती. मधून मधून थोड्याशा मोकळ्या जागेमध्ये काळ्या छपराच्या झोपड्या दिसत. त्यांच्या धुराड्यांमधून पांढुरक्या धुराचे विरळ लोट जात होते. निर्मनुष्य मैदानामध्ये पहिला हिमवर्षाव पसरला होता. पंख विखुरलेले कावळे त्यावर घिरट्या घालीत होते. बहुतेक वेळा आकाशात ढग जमलेलेच असत.

पण माझ्या डब्यातील सहप्रवाशांमुळे मला जरासुद्धा कंटाळवाणं झालं नाही. युद्धात जखमी झालेल्या, कुबड्या घेतलेल्या एका सैनिकाकडे सैन्यातील विनोदी गोष्टींचा एवढा प्रचंड खजिना होता की त्याच्या गोष्टी आणि विनोदाने आमचं सतत मनोरंजन केलं. वरवर रांगड्या आणि निरुपद्रवी वाटणाऱ्या त्याच्या अनंत गोष्टी वास्तवात खऱ्याखुऱ्या सत्यकथा होत्या.



डब्यामधल्या प्रत्येक माणसाला तो हवाहवासा वाटला. आम्ही नोव्होसिबिरिस्क मागे टाकून थोडेसे पुढे गेलो. गाडी एक मिनिटभर एका फ्लॅगस्टेशनवर थांबली. आमच्या लाडक्या प्रवाशाने केलेल्या विनोदाला दाद देत मी खिडकीबाहेर पाहत होते, गाडी सुरू झाली. रूळ बदलणाऱ्या स्विचमनची एकाकी झोपडी दिसली आणि मला एकदम धक्काच बसला. मी दचकून खिडकीपासून दूर झाले आणि लागलीच खिडकीच्या तावदानावर चेहरा दाबत बाहेर पाहिलं. तो दुशेन होता! हो तोच होता तिथे! झोपडीच्या बाहेर हातात झंडी घेऊन उभा होता. मी वेडीपिशी झाले.

'थांबा!' मी घसा फोडून ओरडले, आणि डब्याच्या टोकाकडे धावले. काय करायला हवं याची काही कल्पना नव्हती. पण मला आपतकालीन ब्रेकची साखळी दिसली आणि ती मी जोराने खेचली.

गाडीचे डबे एकमेकावर आदळले. इंजिन खाडकन् थांबलं आणि एकदम थोडसं मागे हटलं. लोकांचं वरच्या फळीवर ठेवलेलं सामान धडाधड खाली आलं. पेले टेबलावरून खाली घसरले, बायका घाबरून किंचाळू लागल्या, मुलं ओरडू लागली. कोणीतरी ओरडलं ''एक माणूस गाडीखाली आला!''

तोपावेतो मी डब्याच्या पायरीवर उतरले होते. काही न बघता मी उडी मारली. कुठे उतरते आहे याचे भानच नव्हते. तशीच आंधळेपणाने मी स्विचमनच्या झोपडीकडे पळत सुटले, दुशेनकडे, माझ्यामागून मला गार्डाच्या शिट्या ऐकू येत होत्या. काही प्रवाशांनी पण खाली उड्या मारल्या होत्या आणि ते माझ्यामागे धावत होते.

गाडीची सबंध लांबी मी पळत पार केली. दुशेनही माझ्याकडेच पळत येत होते.

''दुशेन गुरुजी,'' मी ओरडले.

तो माणूस थांबला आणि मला आश्चर्याने निरखू लागला. तो दुशेन होता. नक्की दुशेनच होता. तोच चेहरा, डोळे. फक्त तो थोडा जास्त वयस्क होता आणि त्याला मिशा होत्या.

''काय झालं, ताई?'' त्याने मोठ्या आस्थेनं कझाक भाषेत विचारलं. ''तुम्हाला मी दुसराच कोणी आहे असं वाटलं. मी इथला स्विचमन आहे अन् माझं नाव आहे बिन्यू.''

"काय बिन्यू?" मी माझी दातखीळ आवळली, तोंडातून किंचाळी फुटू नये म्हणून, निराशा, दुःख आणि शरम गिळून टाकत! मी हे काय केलं! मी मान खाली घातली आणि हातांनी चेहरा झाकून घेतला. मला जमीन गिळून का टाकत नाही असं झालं. आता मला त्या स्विचमनची माफी मागायला हवी. प्रवाशांची पण. त्यांना असा भयानक धक्का दिला म्हणून. हे मला कळत होतं पण मी तिथे अगदी गप्प उभी राहिले. आणि आश्चर्य म्हणजे माझ्याबरोबरचे इतर प्रवासीसुद्धा गप्पच राहिले. आणि त्या गूढ भीतिदायक शांततेमध्ये एका स्त्रीचा हुंदका ऐकू आला.

"बिचारी! तिला तो माणूस आपला नवरा नाहीतर भाऊ वाटला असेल!"

सगळे लोक एकदम जागे झाले.

"काय घडलं हे!" एकजण आपल्या खोल आवाजात म्हणाला.

"अहो पण लढाईमध्ये काय झालं नाही, आपल्यावर कसले कसले प्रसंग गुदरले," आपल्या कापऱ्या आवाजामध्ये एक स्त्री म्हणाली.

स्विचमनने माझे हात माझ्या चेहऱ्यावरून बाजूला ओढले आणि म्हणाला "चल आपण निघू इथून. मी तुला तुझ्या डब्यापर्यंत पोहचवतो. गारठा पडायला लागला आहे."

त्याने माझा हात धरला. एका अनोळखी कर्मचाऱ्याने मला दुसऱ्या बाजूने आधार दिला. "चला आपण निघू या कॉम्रेड, आपण सारं समजू शकतो." तो म्हणाला.

लोकांनी माझी वाट मोकळी केली आणि अंत्ययात्रेमधल्या विरहयातना सोसणाऱ्या मुख्य व्यक्तीसारखं मला डब्याकडे नेलं. आम्ही अगदी हळूहळू चालत होतो. सर्व गर्दी आमच्यामागून येत होती. आजूबाजूला उभे असलेले लागप्रवासीसुद्धा शांतपणे यात्रेमध्ये सामील होत होते. कोणीतरी माझ्या खांद्यावर एक गरम शाल पांघरली. डब्यामधला कुबड्या घेणारा माणूस माझ्या मागोमाग येत होता. मधून मधून आम्हाला गाठून आस्थेने तो माझा चेहरा न्याहाळायचा. हा मोठा विनोदी माणूस, हा आनंदी माणूस, हा दयाळू शूर वीर काहीतरी कारणाने डोक्यावरची टोपी काढून चालत होता. मला वाटतं त्याला पण रडू येत होतं. ती संथ, धिम्या पावलांनी जाणारी यात्रा



गाडीच्या जवळून जाताना, टेलिग्राफच्या तारांच्या गुणगुणीतून मला अंत्ययात्रेचे सूर ऐकू येत होते. नाही. मी त्यांना पुन्हा कधीच भेटू शकणार नाही!

आमच्या डब्याशी आल्यावर मुख्य चालकाने मला अडवलं. तो रागावला होता आणि तावातावाने बोलत होता. माझ्याकडे बोट दाखवीत तो गुन्ह्याची जबाबदारी आणि दंड वगैरे काहीतरी बोलत होता. मी आपली बाजू मांडण्याचा प्रयत्नही केला नाही. मला कशाचीच पर्वा नव्हती. काहीतरी स्टेटमेन्ट त्यांनी माझ्या नजरेसमोर धरलं आणि म्हणाले 'आत्ताच्या आत्ता इथे सही करा." पण माझ्या बोटांमध्ये त्यांनी दिलेली पेन्सिल धरायचीही ताकद उरली नव्हती.

माझ्या कुबड्या घेतलेल्या सहप्रवाशाने त्याच्या हातातून कागद हिसकावून घेतला आणि रागाने त्याच्या तोंडावर ओरडला, "सोडून द्या पाहू तिला. मी करतो सही त्याच्यावर. मीच त्याची जबाबदारी घेतो."

त्यानंतर झालेला उशीर भरून काढण्यासाठी जुन्या रशियन मैदानातून—सैबेरियामधून आमची गाडी पळत सुटली. कोणीतरी गिटार वाजवीत होतं. रात्रीच्या वेळी त्या सुरांमध्ये विषण्णता जाणवत होती. रशियन विधवांची ही विराणी माझ्या मनात मी बाळगीत होते—एक दुःखद आठवण, युद्धाच्या परिणतीला समोरं जाताना येणाऱ्या प्रसंगाची!

त्यानंतर कित्येक वर्षे उलटली. भूतकाळ मागे पडला आणि भविष्यकाळामधील छोट्या मोठ्या जबाबदाऱ्या आवर्जून हाक मारीत राहिल्या. मी पुष्कळ उशीरा लग्न केलं, माझा नवरा फार चांगला माणूस आहे. आम्हाला मुलं आहेत आणि आमचं कुटुंब सुखी आहे. मी तत्त्वज्ञान विषयाची सर्वात उच्च पदवी मिळविली आहे. मला पुष्कळ प्रवास करावा लागतो. मी अनेक देशांमध्ये जाऊन आले आहे... परंतु कुर्कुरूला मात्र मी पुन्हा कधीच गेले नाही. त्याचं कारण आहे. खरं तर बरीच कारणं आहेत. पण मी सबबी शोधत नाहीये. आपल्या गावाचे, घराचे संबंध तोडून टाकणं नक्कीच वाईट आहे. अक्षम्य आहे. पण आहे हे असंच आहे. मी माझा भूतकाळ विसरले नाही. मी विसरू शकणारच नाही. मी केवळ त्यापासून दूर गेले आहे.

डोंगरामधल्या त्या छोट्या छोट्या झऱ्यांचे विचार मनात येतात. एक

नवीन रस्ता झाला आहे, आणि आता ओढ्याकडे नेणारी पाऊलवाट विसरली गेली. तेथे पाणी पिण्यासाठी जाणारे प्रवासी कमी-कमी होत आहेत. आणि हळूहळू तिथे झाडंझुडपांचे जंगल वाढत आहे. काही दिवसांनी तर तिथे ओढा-बिढा काही होता हे तुमच्या ध्यानातही येणार नाही. कधी काळी एखाद्या कडक उन्हाच्या वेळी कुणाला तरी आठवण येईल तिथे ओढा असल्याची. आणि मुख्य रस्त्यावरून वळून तो ओढा शोधत निघेल आपली तहान भागवायला. त्या उपेक्षित ओढ्याशी तो पोहचेल आणि आजूबाजूच्या झाडाझुडपांना बाजूला सारून पाहील. आणि एकदम त्याचा श्वास रोखेल. त्या ओढ्याचं स्वच्छ, खोल, शांत पाणी पाहून तो स्तिमित होईल. कैक दिवस कुणीही न ढवळलेलं आश्चर्यचकित करणारं नितळ पाणी! त्यात तो स्वतःचंच प्रतिबिंब पाहील, सूर्य, आकाश आणि पर्वत पाहील आणि स्वतःशीच म्हणेल, इतकं सुंदर स्थळ माहीत नसणं म्हणजे खरोखर गुन्हा आहे—पाप आहे. आणि माझ्या मित्रांना हे सांगायलाच हवं. पण नंतर तो विसरून जाईल पुन्हा त्या ओढ्याशी येईपर्यंत.

आयुष्यामध्ये असं कधी कधी होतंच. कदाचित् असंच व्हायलाही हवं... कुर्कुरूला नुकत्याच दिलेल्या भेटीमध्ये मला अशा एका ओढ्याची आठवण झाली.

मी तिथून एकाएकी का निघून गेले याचे तुला साहजिकच आश्चर्य वाटलं असणार. "मी तिथे असताना लोकांना हे सर्व सांगू शकले नसते का" असं तू विचारशील. नाही ते मला शक्य नव्हतं. माझ्या जीवाची एवढी घालमेल झाली होती, मला स्वतःचीच एवढी शरम वाटत होती की तिथून मी ताबडतोब निघून जायचं ठरवलं. दुशेनला मी तोंड दाखवूच शकले नसते. त्याच्या डोळ्यांमध्ये पाहणं मला अशक्य होतं, मला स्वतःला सावरून शांतपणे विचार करायची गरज होती. आमच्या गावाच्या लोकांना आणि इतरांनाही काय सांगायचं याचा मला नीट विचार करणं आवश्यक वाटलं.

मी गोंधळून गेले होते, मला लाज वाटत होती ती आणखी एका कारणाने; तेथील लोकांनी एवढं लक्ष दिलं, एवढी खातरजमा केली त्याची खरी हक्कदार मी नाही. शाळेच्या इमारतीच्या उद्घाटनाची मुख्य मानकरी



मी नाही. तो मान आमच्या पहिल्या शिक्षकाला, आमच्या गावाच्या पहिल्या कम्युनिस्ट इसमाला, दुशेनलाच द्यायला हवा होता. तेथील सर्व मंडळींमध्ये दुशेनचाच हक्क सर्वात मोठा आहे. पण होत होतं अगदी याच्या उलट. आपण आपल्यावरच खुष होतो. मेजवानीची मजा लुटत होतो. आणि तो शुद्ध सोन्यासारखा माणूस घोडा दवडीत, आपल्याला आलेले अभिनंदनाचे संदेश वेळेवर पोहचावेत म्हणून जिवाचा आटापिटा करीत होता. आणि ते संदेश आपल्याला सुपूर्द करून तो लागलीच इतरांचे टपाल पोहचविण्यासाठी निघून गेला.

असं मी अनेक वेळा होताना पाहिलं आहे. ही काही अगदी जगावेगळी घटना नव्हे. आणि म्हणून मी स्वतःलाच विचारू लागले : सर्वसाधारण माणसांचा आदर करायचं आम्ही केव्हा विसरलो, लेनिन जसे सर्वसाधारण माणसाला आदराने वागवायचे ते आम्ही विसरलो? त्यातल्या त्यात मला एवढंच समाधान आहे की आम्ही अशा गोष्टींबद्दल मोकळेपणाने बोलतो तरी आता, ढोंगीपणा सोडून. ह्या बाबतीत तरी आम्ही लेनिनच्या बरेच जवळ आलो आहोत हे चांगलेच आहे.

दुशेन किती छान गुरुजी होते हे कुर्कुरूच्या आजकालच्या तरुणांना समजत नाही. आणि जुन्या माणसांपैकी कैक जण आज हयात नाहीत. दुशेनचे कित्येक विद्यार्थी लढाईमध्ये कामी आले. आणि म्हणून या तरुण मंडळींना दुशेनबद्दल सांगणं माझं कर्तव्य आहे. माझ्याजागी आणखी कोणी असतं तरी त्यांनी अभिमानानं हे सर्वांना सांगितलंच असतं. पण मी कुर्कुरूला पुन्हा कधी गेलेच नाही. दुशेनची काही खबरबातही मला मिळाली नाही. कालांतराने माझ्या मनातली त्यांची प्रतिमा एखाद्या संग्रहालयातील बहुमोल पण अबोल अवशेषागत झाली.

मला माझ्या गुरुजींना भेटायचं म्हणजे मी कुर्कुरूला जाईन आणि त्यांच्यासमोर उभं राहून त्यांना जबाब द्यायचा आहे. मी त्यांची माफी मागेन.

मॉस्कोमधल माझं काम आटपलं म्हणजे मी कुर्कुरूला जाईन आणि त्यांना नवीन वसतीगृहाला दुशेनचं नाव देण्यास सांगेन. हो. दुशेनच, सामायिक शेतीचा एक सामान्य पाईक, गावाचा पोस्टमन. माझ्या कुर्कुरूच्या

बांधवांनो मला आशा आहे की तुम्ही मला या कामामध्ये पाठींबा द्याल. कृपा करून द्याच पाठींबा.

आता रात्र टळून गेली आहे. १ वाजला आहे. मी आपल्या सज्जामध्ये उभी आहे. आजूबाजूला शहरातल्या प्रकाशाचा समुद्र आहे, आणि विचार करते आहे की एक दिवस मी कुर्कुरूला परत जाईन, लवकरच. माझ्या गुरुजींना परत भेटेन आणि त्यांच्या पांढऱ्या दाढीचे चुंबन घेईन.

* * *

मी खिडक्या सताड उघडल्या, ताज्या हवेचा प्रवाह झुळझुळ खोलीत सुरू झाला. फिकट, निळ्या, अर्धवट उजेडामध्ये मी माझ्या नवीन चित्रणाच्या आराखड्यांचा विचार करीत आहे. आराखडे बरेच जमले आहेत. कारण अगदी सुरुवातीपासून मला पुन्हा पुन्हा रेखाटावं लागत आहे. संपूर्ण चित्र पाहायला मिळणं अजून खूप दूर आहे. मला अजून मुख्य गोष्टच सापडली नाहीये. सरत आलेल्या रात्रीच्या शांतपणे मी येरझाऱ्या घालीत आहे आणि विचार करीत आहे. सतत विचार, विचार...नेहमी हे असंच होतं. आणि नेहमीच मला जाणवतं की माझं चित्रण अद्यापही एक केवळ पुसट कल्पना आहे.

तरीही त्या अजून चितारलेच न गेलेल्या चित्राबद्दल मला माझ्याशी बोलायचे आहे. मला तुमचा सल्ला हवा आहे. अर्थात तुमच्या आधीच लक्षात आलेलं आहे की ते (चित्र) आमच्या गावच्या आद्य गुरुजींना, पहिल्या कम्युनिस्टाला—वृद्ध दुशेनना अर्पण करायचं आहे.

पण मला अजून खात्री वाटत नाही. या लढवय्याच्या आयुष्यातील सर्व गुंतागुंत मी रंगवू शकेन का? असंख्य मानवांच्या असंख्य दैवगती, त्यांची प्रचंड भावविश्वे आणि या सगळ्याचा त्यांच्या जीवनातला सहभाग हे सगळं मी कसं चितारणार? हा काठोकाठ भरलेला प्याला जराही सांडता कामा नये. त्याला मी माझ्या समकालीनांपर्यंत अदगी सुरक्षित पोहचवलाच पाहिजे. पण हे करणार तरी कसं? केवळ तुम्हाला माझ्या कल्पना सांगून भागणार नाही. माझं हे चित्रण म्हणजे आपणा सर्वांचं सृजन असायला हवं, पण ते करायचं कसं?



हे चित्र रंगवणं तर मला भाग आहे. आणि तरीही माझ्या मनात अजून किती शंकाकुशंका आहेत, संदेह आहे. कधी कधी मला वाटतं मी अगदीच कुचकामाचा आहे. पण मग मी पुन्हा विचार करते : असं असेल तर दैवाने मला कलाकार बनवलंच कशासाठी? हे विचार मला छळतात. पुन्हा केव्हा तरी माझ्यात एवढं बळ येतं की वाटतं मी डोंगरसुद्धा इकडचा तिकडे करेन. मग मी स्वतःलाच सांगते : डोळे उघडून पहा, अभ्यास कर आणि मगच निवड कर. रंगव अलूतिनई आणि दुशेनचे पॉप्लर, ज्यांच्यावर तू तुझ्या बालपणात प्रेम केलंस, ज्यांची गोष्ट तुला माहीत नव्हती तो पॉप्लर. एक अनवाणी मुलगाही रंगव; सूर्यप्रकाशात राहून काळा झालेला, जितक्या उंच पोहचता येईल तेवढ्या उंच फांदीवर बसलेला, मुग्ध होऊन ते गूढ अंतर न्याहाळणारा!

किंवा तू आपल्या चित्राला नाव दे "पहिला शिक्षक" आणि त्यात असं चितार : दुशेन शाळेतल्या मुलांना उचलून ओढ्याच्या पलिकडे नेत आहे. आणि काही तांबड्या फॉक्सहॅट्स् घातलेली अत्यंत मूर्ख माणसं आपल्या तुळतुळीत घोड्यांवरून त्याची टर उडवत, बाजूने जात आहेत.

नाहीतर रेल्वे स्टेशनवरचा एकमेकाला निरोप देतानाचा देखावा चितार. दुशेन ओरडले ते आठवतं आहे ना? मग तुझं चित्र दुशेनच्या हाकेसारखे रंगव, जी हाक अलूतिनईला आजही ऐकू येते. आणि त्यातून प्रत्येक मनात काहीतरी प्रतिसाद उमटू दे.

हे मी स्वतःलाच सांगतो. मी मला स्वतःला अनेक गोष्टी सांगत असतो, पण त्या सगळ्याच प्रत्यक्षात उतरू शकत नाहीत...अजूनही मला कळत नाही काय रंगवावं ते. पण मला एक गोष्ट नक्की माहीत आहे. मी प्रयत्न सोडणार नाही!

□□

Printed at: Compudata Services, New Delhi-20

